"सब्बदानं धम्मदानं जिनाति।"

# धर्मपद

(सुबोध मराठी भाषांतरासह)

अनन्त रामचंद्र कुलकर्णी

सन १९५६] साधी प्रत २ रुपये अर्धकापडी २॥ रुपये [बुद्धाब्द २५००

# आभारप्रदर्शन

ह्या पुस्तकाला लागणारा समग्र कागद नागपूरचे सुप्रसिद्ध दानशूर श्रीमंत बाबुराव धनवटे यांनी दिला आहे. ह्या त्यांच्या उदा देणगीबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. तसेंच ज्या ज्या सद्गृहस्थांनी हे पुस्तक छापण्यास मला आर्थिक मदत केली त्यांचा सुद्धा मी ऋणी आहे

श्रीयुत लक्ष्मण रामचंद्र कुळकर्णी, एम्. ए., माजी प्रमुख, पाली भाषाविभाग, नागपूर विश्वविद्यालय यांनी धर्मपदाचें हें भाषांतर करण्याचे वेळीं मला जी मदत केली तिजबद्दल मी त्यांचा आभारी आहे

तसेंच नारायण मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्रीयुत पांडुरंग नारायण धनहट्टी यांनी हें भाषांतर व प्रुफें तपासण्यांत मला बरीच मदत केली आहे, त्याबद्दल मी त्यांचा सुद्धा ऋणी आहे.

नागपूर ता. १८-५-५६ अनंत रामचंद्र कुळकर्णी

---

मुद्रक :

पां. ना. धनहट्टी, बी. एस्सी.,
व्यवस्थापक, नारायण मुद्रणालय, धंतोली, नागपूर

प्रकाशक :

अनन्त रामचंद्र कुळकर्णी,
सेक्रेटरी, बुद्ध सोसायटी,
धरमपेठ, नागपूर १

फट् कहकर

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

# अनुक्रमणिका



कहकर दाहिने हाथसे एक बारमें कुश उखाड़े—
विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

# दोन शब्द

माझे मित्र श्रीयुत अ. रा. कुळकर्णी, सेक्रेटरी, बुद्ध सोसायटी, नागपूर, हे १९४४ सालापासून भगवान बुद्धाच्या शिकवणुकीचा प्रचार करीत आहेत व बौद्धधर्मप्रसारार्थ त्यांनी १९४६ मध्ये आपल्या वादत चाललेल्या वकिलीच्या धंद्याला रामराम ठोकून एकनिष्ठेने भगवान बुद्धाच्या धर्माचा प्रचार करण्यास सुरवात केली. त्यांच्या मतें बुद्ध-धर्म हिंदु धर्मापासून निराळा नाही. हिंदु धर्मातील सर्व विचार व तत्त्वें यांत आहेत व बुद्धीला पटतील अशा रीतीने तीं भगवान् बुद्धाने सांगून लोकांस हा धर्म शिकविला आहे.

आगामी बुद्ध जयंती ही भगवान् बुद्धाची २५०० वी जयंती आहे. ह्या प्रसंगी श्री कुळकर्णी यांनी परिश्रम घेऊन धर्मपद या बौद्ध धर्मग्रन्थाचें मराठी भाषांतर जनतेपुढे ठेवण्याचें ठरविलें हें ठीकच आहे. ह्या भाषांतराचे काही भाग मी वाचले. धर्मपद हा आचार-प्रधान प्रसिद्ध ग्रन्थ आहे व श्रीयुत कुळकर्णी यांनी सर्वसाधारण लोकांना समजेल अशा भाषेत त्याचें भाषांतर करून तें जनतेपुढे ठेवलें आहे. बुद्ध सोसायटी (नागपूर)चा अध्यक्ष या नात्याने मी श्रीयुत कुळकर्णी यांचें त्यांच्या या कार्याबद्दल अभिनंदन करितों. या ग्रन्थास स्वतः श्री. कुळकर्णी यांनी 'हृद्गत' रूपाने प्रस्तावना लिहिली आहे व डॉ. नियोगी यांनी उद्बोधक सविस्तर पुरस्कार लिहून श्रीयुत कुळकर्णी यांच्या प्रयत्नाबद्दल त्यांना यश चिंतिलें आहे. मी सुद्धा श्रीयुत कुळकर्णी यांना त्यांच्या या कार्याबद्दल सुयश चिंतितों व त्यांचें बौद्ध धर्म अथवा सद्धर्म प्रचारकार्य उत्तरोत्तर वाढो अशी भावना प्रकट करितों.

सिव्हिल स्टेशन, नागपूर,<br>दिनांक १८-५-५६

वा. रा. पुराणिक<br>अध्यक्ष, बुद्ध सोसायटी, नागपूर

# पुरस्कार

श्री. अनंत रामचंद्र कुळकर्णी यांनी धम्मपदाचें भाषांतर करून तें जनतेपुढे सादर केलें आहे. श्री. कुळकर्णी हे सर्वांच्या परिचयाचे आहेतच. त्यांनी आपला वकीलीचा व्यवसाय सोडून बुद्धधर्माच्या प्रचारकार्याला स्वतःला वाहून घेतलें आहे. या पुस्तकाच्या प्रकाशनाने भगवान बुद्धाच्या धर्मोपदेशाचें ज्ञान बहुजन समाजाला सहज प्राप्त होईल.

बुद्धधर्म ज्या ग्रंथराशींत साठला आहे त्याला त्रिपीटक असें म्हणतात—१ लें सुत्त पीटक, २ रें विनय पीटक, ३ रें अभिधम्म पीटक. सुत्त पीटकाचे दीघनिकाय, मज्झीमनिकाय व खुद्दकनिकाय असे भाग आहेत. सूत्त पीटकांत भगवान बुद्धाचा उपदेश त्यांच्याच शब्दांत संग्रहित केला आहे. धम्मपद हें खुद्दक निकायांत अंतर्भूत आहे. त्रिपीटिकेप्रमाणे धम्मपदहि मूळ पाली भाषेंत आहे. यांत २६ अध्याय असून श्लोक संख्या ४२३ आहे. धम्मपदाच्या प्रती चिनी व तिबेटी भाषेंतहि आहेत. धम्मपद हें भगवान बुद्धाच्या धर्माचें सार आहे.

भगवान बुद्धाच्या उपदेशाचें रहस्य समजण्यास वैदिक धर्माच्या वैचारिक पूर्वपीठिकेकडे लक्ष दिलें पाहिजे. ज्याला हिंदुधर्म म्हणतात तो पौराणिक आहे, शुद्ध वैदिक नाही. पौराणिक धर्मामध्ये भक्ति व मूर्तिपूजा यांना प्राधान्य आहे. वैदिक धर्मामध्ये यांना असें स्थान नव्हतें भगवान बुद्ध हे वैदिक परंपरेंतून उदयास आले होते ही गोष्ट वाचस्पति मिश्रासारख्या महापंडितानेच प्रतिपादन केली आहे. भोपाळ जवळच्या सांची नामक टेकडीवर अशोककालीन खोदकामाचीं चित्रें आहेत. त्यांत भगवान बुद्धाला संबोधि म्हणजे बुद्धत्व प्राप्त झालें प्रसंगाचें चित्र आहे. त्यांत अश्वत्थवृक्ष व ओटा दाखविला आहे,



दाहिने हाथसे एक बारमें कुश उखाड़े—

सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।

सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

पण बुद्धाची मूर्ति नाही. याचा अर्थ असा की इसवी सनापूर्वी २५० वर्षेपर्यंत बुद्धाच्या मूर्ति केल्या जात नसत. याचें कारण हें की बुद्ध हे वैदिक परंपरेंतील होते.

वैदिक धर्म हा विश्वव्यापक धर्म आहे. तसा पौराणिक धर्म नाही. भगवान् बुद्धाने उपनिषदांतील धर्मांच्या पायावर आपला धर्म उभारला व तो सर्व जगांत प्रसारित केला. मॅक्स् मुल्लर साहेबाने असें म्हटलें आहे : "यहुदि, ग्रीक, रोमन किंवा ब्राह्मण लोकांनी धर्मप्रसाराचें कार्य केलें नाही. कारण धर्म ही राष्ट्रीय संपत्ति आहे अशी त्यांची समजूत होती. धर्म हा जन्मनिष्ठ असतो अशीच भावना होती. परंतु जगाच्या इतिहासांत बुद्धानेच प्रथमतः धर्मप्रसाराच्या उपक्रम सगळ्या जगांत केला." मॅक्समुलर साहेब पुढे म्हणतो : ज्या "प्रकारें यहुदी धर्माचा संबंध खिस्ती धर्मांशीं आहे, तसाच संबंध ब्राह्मण धर्माचा बुद्धधर्मांशीं आहे. बुद्ध धर्म हा जगद्व्यापि होऊं शकला. परंतु ब्राह्मण धर्म हा संकुचितच राहिला." हें खरें आहे. हिंदुधर्मामध्ये जे मुख्य अवतार आहेत ते राम, कृष्ण व बुद्ध आहेत. त्यांपैकी राम व कृष्ण राष्ट्रीय पण बुद्ध मात्र जगद्वंद्य झाला आहे. सम्राट अशोकाच्या एका शिलालेखांत त्याने बुद्ध धर्म प्रचारक सिरिया, ॲंटियोक, अलेक्झॅंड्रिया इत्यादि ठिकाणीं पाठविले आहेत असे नमूद केलें आहे या व इतर पुराव्यावरून हॅवेलने, या बुद्ध भिक्षूंनी खिस्ती व महंमदी धर्मांची भूमिका तयार केली असा निर्णय दिला आहे. यावरून हें स्पष्ट होते की जगांतील प्रचलित बहुसंख्य धर्मांचा उगम भगवान् बुद्धाच्या शिकवणींत आहे. त्यांची शिकवण काय होती हे सांगण्यापूर्वी, वैदिक–वेदांतिक धर्माबद्दल आपणांस थोडी माहिती असणें अवश्य आहे.

वैदिक धर्म म्हणजे यज्ञ संस्था. त्यामध्ये देवतांना व कर्मठपणाला फार प्राधान्य असे. वेदांतांत म्हणजे उपनिषदामध्ये ज्ञानाला व सत्कर्माला श्रेष्ठ स्थान मिळालें. एक ब्रह्म अथवा आत्मतत्त्व काय तें सत्य

आहे व त्याच्या प्राप्तीचा मार्ग सदाचार हा आहे असें प्रतिपादन होऊं लागलें. तसेंच ब्राह्मणत्व हें जन्मावर अवलंबून नसून सत्य-निष्ठेवर आहे.

" साधुकारी साधु भवति, पापकारी पापो भवति ।
पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन भवति ॥ "

तसेंच सत्यं वद, धर्मं चर, पितृदेवो भव अशा प्रकारचा आदेश बालकांना देण्यांत येत असे. त्यामुळे कर्मठपणावरची श्रद्धा व स्वर्ग-प्राप्तीची आशा ही नाहीशी होऊन त्याजागीं दम, दान, दया व मोक्ष या कल्पना उदयास आल्या. "आत्मयाजी श्रेयो देव याजिनाम्" म्हणजे देवांची उपासना करणाऱ्यापेक्षा जो आत्मज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करतो तो श्रेष्ठ आहे, अशा तत्वाचा पुरस्कार होऊं लागला. ज्ञानाला महत्व आलें. "आत्मा विजरो विमृत्युः विशोको सत्यकामः सत्यसंकल्पः" असा आहे म्हणून "सोऽन्वेष्टव्य." म्हणजेच त्याचा शोध करावा असा उपनिषदांत आदेश आहे. याला अनुसरून नारदाने सनत्कुमाराला म्हटलें, "मी केवळ मंत्रविद् म्हणजे शब्द-पंडित आहे. . "नाहं आत्मविद्" म्हणजे मी आत्म्याला जाणणारा नाही. "सोऽहं भगवा शोचामि" म्हणजे हे भगवन् मी दुःखांत आहे. कारण काय ? कारण त्याचा स्वार्थ सुटला नव्हता. त्याला सनत्कुमाराने उपदेश दिला. "यो वैभूमातत्सुखं, नाल्पे सुखमस्ति," "अहमेव इदं सर्वं" हें तत्व जाणून "आत्मक्रीड, आत्मानंद" होशील तेव्हा तुला "स्वराट" म्हणजे दुःखाचा लवलेश नसलेलें अक्षय्य सुख प्राप्त होईल असें म्हटलें आहे. याच स्थितीचें वर्णन श्वेताश्वतर उपनिषदामध्ये "न तस्य रोगो न जरा न मृत्युः प्राप्तस्य योगाग्निमयं शरीरम्" असें केलेलें आढळतें.

यावरून बुद्धानी एक रोगी, एक म्हातारा, एक प्रेत अशीं दृश्यें पाहिल्यावर तो संसारत्याग करून सत्याच्या शोधार्थ कां निघाला हें

---

, फट्' कहकर दाहिने हाथसे एक बारमें कुश उखाड़—
करना विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
है— नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

स्पष्ट होतें. त्यांच्या मनांत जो उपदेश ठसला होता तो अशा उपनिषद विचारांचाच होता. ते आपल्या वयाच्या २९ वे वर्षी गृहस्थाश्रमांतून निघाले, तपश्चर्या व गहन विचार करून त्यांनी "संबोधी" म्हणजे पूर्ण प्रज्ञा प्राप्त केली ही मानसिक स्थिति त्यांनी या शब्दात व्यक्त केली—

> गृहकारक दृष्टोऽसि पुनः गेहं न कार्यसि ।
> तण्हाणं खयमज्झगा ॥

म्हणजे हें घर बनविणाऱ्या, मी तुला पाहिलें, याउपर तूं घर बांधूं शकत नाहीस; कारण माझ्या तृष्णेचा क्षय झाला. यांत एक महत्त्वाची गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे, ती ही की "अनि म्या ब्रह्म पाहिलें" अशी भाषा ते वापरत नाहीत. परंतु अतःकरणांत घर करून बसलेली जी तृष्णा तिचा नायनाट झाला असें म्हणतात. माणसाला हीच तृष्णा अनेक प्रकारचीं दुष्कृत्यें करावयास लावते, म्हणूनच उपनिषदामध्ये मनुष्याला "काममयोऽयं पुरुषः" असें म्हटलें आहे. काममयता हीच तृष्णा, हिलाच अज्ञान, अविद्या असे पर्यायवाचक शब्द आहेत. हेंच गीतेमध्ये "अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः" अशा शब्दानें सुचविलें आहे. श्री शंकराचार्यहि "अज्ञान निवृत्तिरेव मोक्षः" असा निषेधमुख (negative) वाणीनें सांगतात. तेविज्ज सुत्तांत भगवान बुद्धानें हीच गोष्ट एका दृष्टान्तानें सांगितली. तो असा, समजा एखाद्याला या अचिरवती नदीच्या पार जावयाची इच्छा आहे. परंतु तो इकडल्या तीरावर साखळदंडानें बांधला गेलेला असा पडला आहे. तर तो आपल्या बेड्यांतून मुक्त झाल्याशिवाय परतीरावर जाऊं शकेल काय? अर्थातच नाही. कां? तर तो बंदिस्त आहे म्हणून. यास्तव बंधनातून स्वतःला मुक्त करून घेणें हेंच त्याचें आद्य कर्तव्य आहे हें स्पष्ट होतें. हें बंधन म्हणजे कामतृष्णा.

या ठिकाणीं असा प्रश्न उत्पन्न होतो की वेदपठन करावें, प्रवचनें करावीं, देवाची आराधना करावी, ब्रह्म अथवा आत्मचिंतन

करावें, तीर्थयात्रा करावी असें कांहीच सांगितलें नाही. हा कोणत्या तऱ्हेचा धर्म त्यांनी शिकविला ? याला उत्तर असें—छान्दोग्य उपनिषदाच्या आरंभीं "ये उपनिषद्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु" असा संकल्प आहे. तो जो उपनिषद् धर्म तोच भगवान् बुद्धाचा धर्म. तो कसा हें आपण पाहूं.

याज्ञवल्क्याला जनक राजाच्या दरबारात गार्गीने ब्रह्मासंबंधाने प्रश्न केला. त्याला याज्ञवल्क्याने उत्तर दिलें : "मातिप्राक्षीः मा ते मूर्धा व्यपप्तत्"—अधिक प्रश्न करूं नकोस; तुझें शीर तुटून पडेल. तसेंच त्याच्या भार्येने-मैत्रेयीने विचारलें तेव्हा तो म्हणाला : "विज्ञातारम् अरे केन विजानीयात्" जो मनुष्याच्या जाणिवेचा जाणता आहे त्याला कोण जाणूं शकतो ? हीच गोष्ट भगवान् बुद्धाने दृष्टांतांनी उपदेशिली. एक दृष्टांत असा : एक मनुष्य माडावर माड्या बांधीत होता. त्याला विचारलें असें कां करतोस ? तो म्हणाला, मला ब्रह्मलोकामध्ये जावयाचें आहे. महाल बांधून व त्याच्या अत्यन्त उच्च शिखरावरून कोणी ब्रह्मलोकास पोचूं शकेल काय ! दुसरा दृष्टान्त असा : एक प्रेमान्ध मनुष्य म्हणतो, मला या देशांतील जनपद कल्याणी म्हणजे सुंदरतम स्त्री मिळविण्याची कामना आहे. ठीक आहे, त्याला विचारलें : तूं ज्या स्त्रीवर प्रेम करितोस ती काळी की गोरी, लठ्ठ की सडपातळ, उंच की ठेंगणी, तिचें नांव काय, गोत्र काय ? इत्यादि प्रश्न विचारले तर तो म्हणतो, मला माहीत नाही. असें आहे तर भगवान बुद्ध म्हणतात ज्या स्त्रीला तूं कधीच पाहिलें नाहीस अशा स्त्रीवरचें तुझें प्रेम प्रामाणिक म्हणतां येईल काय ? सारांश, मनुष्य स्वतः अंधारांत राहूनच प्रकाशाची आशा करितो हाच सर्वांचा अनुभव आहे.

भगवान बुद्ध हे स्वतःला विभज्यवादी म्हणजे बुद्धिवादी असें म्हणत असत. अंधकाराने व्यापलेल्या अशा खोल कूपांतून वर प्रकाशांत येण्यास उपयोगी पडणारी दोरी ही बुद्धि आहे. या बुद्धीच्याच साह्याने

फट्' कहकर दाहिने हाथसे एक बारमें कुश उखाड़—
करना विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
है— नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

"यो बुद्धेः परतस्तु सः" अशा ब्रह्मतत्त्वाला ते जाऊन मिळाले, यास्तव त्यांना ब्रह्मभूत, धर्मभूत, सुगत, तथागत अशी संज्ञा प्राप्त झाली.

त्यांचे म्हणणें हें होतें की मनुष्याला जसे हात पाय आहेत, तसीच बुद्धि आहे. एक चालला तर दुसऱ्या बसलेल्या माणसाचें स्थलांतर होणार नाही; एकाने आपल्या तोंडांत घास घातला तर दुसऱ्याचें पोट भरणार नाही; तसेंच एकाने बुद्धि चालविली तर दुसऱ्याला ज्ञान मिळत नाही. "तुम्हेहि किच्चमातप्पम्, आख्यातारो तथागताः" तुम्हालाच मार्ग चालून धामाधूम व्हावें लागेल; तथागत हे केवळ मार्गदर्शक संकेतमात्रच आहेत.

असला उपदेश चर्चिल साहेबाने गेल्या महायुद्धांत केला होता की नाही ? त्याचा प्रभाव अतीशय साफल्यांत दिसला. हा आत्म विश्वासाचा स्वयंनिर्णयाचा व प्रयत्नवादाचा खरा उपदेश आहे. हा धडा उपनिषदांतून शिकविलेला आढळतो. तो असा.

नायं आत्मा प्रवचनेन लभ्यः ।
नायं आत्मा बलहीनेन लभ्यः ॥

मग तो कसा मिळतो ?

सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा ।
सम्यङ् ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ॥

याला अनुसरुन भगवान् बुद्धांनी चारिका सुत्तामध्ये आपल्या पहिल्या साठ शिष्यांना आदेश दिला तो असा—"चरथ भिक्खवे चारिकम्, बहुजनहिताय बहुजनसुखाय, लोकानुकंपाय, अत्थायहिताय देवमनुस्साणम्, परिओसान कल्याणम् । सात्थं, सव्यंजनम्, केवल परिपूर्णम्, परिशुद्धम्, ब्रह्मचर्यम् प्रकासेथ ॥" यांत सत्य, धर्म, ब्रह्मचर्य ( सदाचार ) व बहुजनांचें हित यावर जोर दिला आहे. याचा आशय जागणें हें वर्तमानकाळीं फार अवश्य आहे. राष्ट्रोन्नति इच्छिणाऱ्या प्रत्येकाच्या अंतःकरणांत ही जीवन-ज्योति प्रज्वलित राहिली

तरच आपण यशाचे धनी होऊं. आता आमच्या तरुणांना असें वाटतें, स्वातंत्र्य मिळालें; चैन करा; सुख भोगा. या वृत्तीने सुख टिकणार आहे काय ! स्वातंत्र्यहि चिरंतन होणार आहे काय ! याला उत्तर मी भगवान् बुद्धाच्या शब्दानच देतों. "अत्ताहि अत्तनो नाथो कोहि नाथो परोसियो" (आपण स्वतःच आपले स्वतःचे मालक आहोंत; दुसरा कोणी नाहीं;) तुम्हेहि किच्चम् आतप्पम्, आख्यातारो तथागताः (तुम्हालाच परिश्रम केले पाहिजेत, तथागत हे केवळ मार्गदर्शक आहेत). हा स्वावलंबनाचा मार्ग त्यांनी दाखविला.

भगवान् बुद्धाचा उपदेश संक्षिप्तपणे असा आहेः—

" सब्ब पापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा ।
सचित्त परियोदपनं एतं बुद्धान सासनं ॥ "

हें वचन दिसायला सोपें वाटतें. परंतु बुद्धाला विचारापेक्षा आचारच महत्त्वाचा वाटत होता. कर्मवाद अथवा कर्मठपणा, व्रतवैकल्यें, यज्ञयागादि क्रिया यानाच त्या काली आचार मानीत. या कर्मकलापास ते शीलव्रत परामर्श असें म्हणत असत. व त्याचा निषेध करीत असत. आचार म्हणजे नीतितत्त्वाला धरून असणारी प्रत्यक्ष व्यवहारांतील वागणूक असा त्यांचा आशय होता. पाप काय व पुण्य काय हें ठरविणें कठीण आहे. त्याची कसोटी काय ? त्यांनी " आत्मनस्तु कामाय सर्वाः प्रियाः भवंति " या याज्ञवल्क्याच्याच सिद्धांताची फोड करून दाखविली त्यावरून ती कसोटी स्पष्ट होते. ते म्हणाले, "विचारांच्या द्वारें आपण सगळ्या अफाट विश्वांत संचार करतों, पण आपल्याला आत्म्याहूनकें प्रिय असें कांही आढळत नाहीं." आत्मा जर इतका प्रिय आहे तर आत्मप्रेमी माणसाने दुसऱ्यावर उपकार करूं नये. "आत्मनः प्रतिकूलानि परेषाम् न समाचरेत् " त्याचप्रमाणे "यद्यदात्मनीच्छेत तत् परस्यापि चिंतयेत्" हा ओघानेच अर्थ निघतो. हें तरच मनांत चिंतण्याकरिता मनच सद्विचाराने शुद्ध करावयाला

---

ेरी फट्' कहकर दाहिने हाथसे एक बारमें कुश उखाड़—
करना विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
ो है— नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

पाहिजे; म्हणून 'सचित्त परियोदपनं' या आदेशाला फार महत्त्व आहे; धर्मपदाच्या पहिल्याच श्लोकांत भगवान् बुद्धाने "मनोपुब्बंगमा धर्मा" म्हणजे सगळ्या चांगल्या किंवा वाईट प्रवृत्तींना कारण मन आहे हें प्रतिपादन केलें आहे. हेंच गीतेमध्ये "मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः" या श्लोकार्धांत व्यक्त केलें आहे. लढाईचा उगम मनुष्याच्या मनांत होतो असें प्रतिपादन करून 'यू. एन्. ओ. ने सुद्धा आपल्या उद्दिष्टांत हीच गोष्ट स्पष्ट केली आहे.

आता प्रश्न असा निघतो : बंध म्हणजे काय व मोक्ष म्हणजे काय ? आता आपण क्षणभर नारद सनत्कुमाराच्या संवादाकडे वळूं. नारदाला ज्ञान प्राप्त झाल्यावर तो कसा झाला ? याचें वर्णन याज्ञवल्क्याच्या संभाषणांत मिळतें. तें "अन्यदार्तम्" या शब्दांत आढळतें. 'अन्यदार्तम्' म्हणजे 'दुःखविमोचन'— दुःखाच्या पलीकडे जाणें.

भगवान बुद्धाने याच दिशेने आपल्या प्रथम उपदेशांत विचार मांडला. याला धर्मचक्रप्रवर्तन सूत्र म्हणतात. या सूत्रांत त्यांनी चार सत्यांचें प्रतिपादन केलें आहे. याला चत्वारि आर्य सत्यानि असें म्हणतात. पहिलें आर्य सत्य हें दुःख. मनुष्य कितीहि बलवान, धनवान व विद्वान असला तरी त्याला दुःख कधीच शिवत नाही असें नाही. "जगीं सर्व सुखी असा कोण आहे। विचारी मना तूंचि शोधोनि पाहे" असें श्रीरामदास स्वामींचें वचन आपल्याला स्मरतच असेल. भगवान बुद्ध याच्या पुढे जाऊन परमार्थिक दृष्टीने मानवाला "आपल्या जीवनाकडे पहा" असें म्हणतात. त्यांत काय दिसतें ?—सर्व दुःखापासून मनुष्य मुक्त झाला तरी तो व्याधि, जरा व मृत्यु या त्रिकुटाच्या पाशांतून कधी मुक्त झाला आहे काय ? कधीच नाही—हेंच उत्तर द्यावें लागेल. मग मुक्त होण्याचा उपाय काय ? उपाय हा की जसें आपण एखाद्या रोगाचें निदान करतों, म्हणजे कारण शोधून काढतों तसें पहिल्यांदा कारण शोधा, शोधल्यावर आपल्याला असें दिसून येईल की सर्व दुःखांचा

उगम काम-तृष्णा, भव-तृष्णा व विभव-तृष्णा यांत आहे. "काममयोऽयं पुरुषः" असें जें उपनिषदांत सांगितलें त्याला हें धरून आहे. स्वभावतः मनुष्य विषयवासना तृप्त करण्याकरिता आपल्या देहाचा उपयोग करीत असतो व ज्या अर्थी प्रत्येकाचा देह हा निराळा त्या अर्थी तो आपल्या देहाचेंच हित साधण्याचा अहर्निश प्रयत्न करीत असतो. यांतूनच "जीवन कलह"—"Struggle for existence" उत्पन्न होतो व त्याची परिणति "Survival of the fittest" -वळी तो कानपिळी या सिद्धांतांत होते. अशा स्थितीमध्ये मनुष्य हा निर्बुद्ध पशूसारखाच वागतो.

मनुष्य व जनावर यामध्ये भेद हा की मनुष्य आपल्या बुद्धीने कारणाचा शोध लावतो. मग कारणाचा शोध लागला म्हणजे त्या कारणाचा निरोध करणें हें त्याचें कर्तव्य होत नाहीं काय ? अर्थात होतें. याचाच इंद्रिय-निग्रह म्हणतात. ही जाणीव उत्पन्न झाली म्हणजे मनुष्य हा प्राणिकोटींतून नैतिक मार्गानें देवकोटीकडे जाऊं लागतो.

या मार्गाला बुद्धानें अष्टांग मार्ग म्हटला आहे. तो असाः— सम्यक् दृष्टि; सम्यक् संकल्प; सम्यक् वाचा; सम्यक् कर्म; सम्यक् आजीव, (म्हणजे प्रामाणिक जीविका) सम्यक् व्यायाम (भावना); सम्यक् स्मृति (म्हणजे मी निकृष्ट प्राण्याहून निराळा आहे हें सदैव लक्षांत आणणें) व सम्यक् समाधि (म्हणजे समाधान). या मार्गानें गेलें म्हणजे मनुष्याला या जगांत शांति मिळते व मन प्रसन्न राहतें. त्या योगानें माणसाची सत्कर्म-प्रवृत्ति कायम होते. यालाच शीलसंवर्धन किंवा विनय असें म्हणतात.

धर्मचक्रप्रवर्तन सूत्रानंतर भगवान् बुद्धाने दुसऱ्यांदा उपदेश केला, त्याला अनात्म-लक्षण सुत्त असें म्हणतात. भगवान् बुद्धांनी "अनात्म" या शब्दावर फार भर दिला या कारणानें ते आत्म्याचें अस्तित्व मानीत नव्हते असा भ्रामक प्रचार केला जातो. पण तो असा—

...) फट्' कहकर दाहिने हाथसे एक बारम कुश उखाड़— करना विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
...ता है— नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

स्त्रीय आहे, तें कसें तें पहा. ते काय म्हणतात ? त्यांनी देहधर्माचे पांच भाग* दाखविले. ते असे रूप ( म्हणजे स्थूल देह ), संवेदना (Sensations), संज्ञा (perception), संस्कार (impressions), विज्ञान (discriminatory consciousness). असें विश्लेषण केल्यानंतर ते विचारतात, "स्थूल देह हा नश्वर किंवा नित्य" याला उत्तर नश्वर असेंच द्यावें लागेल. "मी" (अहं) असें म्हणणारा हा वस्तुतः नश्वर आहे काय ? याला उत्तर आहे असें वाटतें. परंतु तो "नश्वर नाही" असेंच मौलिक उत्तर देणें शास्त्र-शुद्ध आहे तें कसें तें पहा. जो आज ७० वर्षांचा वृद्ध आहे तो पाळण्यात असतांना, विद्यार्थी असताना कसा होता ? त्याचें पाळण्यातलें शरीर कोठे गेलें ? आपण म्हणूं तेंच हें ! अशी कल्पना होण्यास अवसर मिळूं नये म्हणून बुद्धांनी "रूप" हा शब्द बुद्धिपुरःसर वापरला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. शरीर हा शब्द वापरला तरी अर्वाचीन शास्त्रावरून "शरीर" सात वर्षांत समूळ बदलतें. तरी मनुष्य "मी"च म्हणतो. यावरून नश्वर देहांत नित्य असें काही तत्त्व आहे हें स्पष्ट होतें. हीच गोष्ट विज्ञानापर्यंत सगळ्या पंचस्कंदाबद्दल सत्य ठरते.

आता "देह" किंवा "विज्ञान" "मी" नाही असें विधान केलें तर "मी"चा अभाव दाखवितो काय ? "हा मनुष्य जनानी नाही" असें आपण म्हटलें तर त्याचा अर्थ "हा मनुष्य मनुष्यच नाही" असा कोणीहि करीत नाही. तद्वतच देह किंवा विज्ञान आत्मा नाही असें म्हटलें तरी आपण आत्म्याचा निषेध करीत नाही, तर आत्मा हा देह व विज्ञानाहून निराळा आहे असें विधान करतों.

आता आपण विचाराल, बुद्ध हे सरळ आत्मा आहे असें न म्हणतां, अशा उलट्या मार्गाने का सांगतात ? त्याचें कारण असें की त्यांना केवळ "आत्मा आहे" हें प्रतिपादन करावयाचें नव्हतें तर ज्या देहावर माणसाची आसक्ति असते व ती "मी" म्हणजेच देह या

* यांना पंच-स्कंद असें म्हणतात.

समजुतीपासून उद्भवते, ती समजूत "अज्ञान किंवा अविद्या" मूलक आहे असा त्यांचा आशय होता.

पण यांतून काय निष्कर्ष निघतो, असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो. ते देह टाकून द्या, आत्महत्या करा असें म्हणत नाहीत, हें कशावरून ! तें अशावरून की त्यांनी ४० दिवस उपवास केल्यानंतर ते मरणोन्मुख झाले, तेव्हा त्यांना पटलें. शरीर गेलें तर ज्ञान कोणास मिळणार ! म्हणून ज्ञानी होण्यास व त्याप्रमाणे जगांत कर्मे करीत राहण्यास शरीर हें अवश्य आहे. या दृष्टीने शरीर हें एक ज्ञानाचें व कर्माचें साधन ठरतें. त्याला मूल्य आहे पण साधन म्हणून. फलश्रुति म्हणजे लक्ष्य हें आत्मलाभांत आहे. यालाच Infinite किंवा पारमार्थिक मूल्य म्हणतात. सारांश, तपश्चर्या करून अंग झिजविण्या-पेक्षा बुद्धीची उपासना करून तिला उन्नत करणें हाच श्रेष्ठ मार्ग आहे व हाच भगवान बुद्धाचा मध्यम मार्ग होय. देहमंडन व देह-दंडन हें दोन्ही जीवनाचें ध्येय म्हणू नका, हाच बुद्धाचा जगाला उपदेश आहे. याच मार्गाने जो "मी देह किंवा विज्ञान" नाही अशा बुद्धीने कर्मे करीत राहतो, तोच खरा जीवन्मुक्त आहे. हाच पुरुष "बोधिसत्व" म्हटला जातो. याचेंच वर्णन गीतेमध्ये

> लभन्ते ब्रह्म निर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।
> छिन्न द्वैधा यतात्मानः सर्वभूतहितेरताः ॥

अशा रीती मार्मिक मथित केलें आहे.

हें भाषांतर श्री कुळकर्णी यांनी परिश्रम करून तयार केलें, म्हणून ते अभिनंदनास पात्र आहेत. भाषांतर सरळ व सुबोध आहे, व त्यामुळें बुद्धधर्माच्या अभ्यासाचें द्वार खुलें झालें आहे. हें पुस्तक लोकादर संपादन करून भाषांतरकर्त्यांच्या परिश्रमाचें चीज त्यांच्या पदरांत पडेल अशी मला पूर्ण आशा वाटते.

भवानीशंकर नियोगी

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | ५ | धर्मोपदशाचे | धर्मोपदेशाचे |
| ६ | १२ | त्रिपीटिकेप्रमाणे | त्रिपीटकाप्रमाणे |
| ६ | १९ | नव्हते | नव्हते. |
| ७ | १० | धर्मप्रसाराच्या | धर्मप्रसाराचा |
| १० | ९ | मैत्रेयाने | मैत्रेयीने |
| १२ | ४ | कोई नाथो परोसियो | कोहि नाथो परोसिया |
| १६ | ११ | दोन्ही | दोन्ही अंत टाळून |
| (१) | २० | येऱ्या गव्हाळांचें | येरा गव्हाळांचें |
| (५) | ६ | आणि | आणि हा |
| (५) | २१ | अपामाणिक | अप्रामाणिक |
| (९) | ९ | थेरगाया | थेरगाथा |
| (९) | १० | थेरीगाया | थेरीगाथा |
| (५०) | २५ | वर्षे | दिवस |
| (५५) | ७ | विज्जडी | विज्जती |
| (५६) | ६ | ३३२ | १३२ |
| (५६) | ६ | मुत्तकामानि | मुत्तकामानि भूतानि |
| (५६) | २५ | रालेल्या | राल्लेल्या |
| (६४) | ११ | अत्तदत्थं | अत्तदत्थं |
| (६४) | १४ | अत्तदत्थं | अत्तदत्थं अभिञ्ञाय |
| (६५) | २१ | नप्पमज्जाति | नप्पमज्जति |
| (६६) | ४ | झावळ | झाकळे |
| (७५) | ७ | कुत्तो | कुतो |
| (७७) | ९ | नाम–रूपस्मिं | तं नाम-रूपस्मिं |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| (७८) | १० | अच्चुत | अच्चुतं |
| (९१) | १२ | मनुष्यांथ | मनुष्यांत |
| (९३) | ८ | वरांतून | वैसंतून |
| (९७) | १ | घेलें | केलें नाही |
| (९८) | १६ | सुकथ | सुकर्म |
| (९९) | १२ | बाळगणे | बाळगणारे |
| (१०१) | १ | आहे. | आहे, |
| (१०४) | १६ | पुनप्पुंन | पुनप्पुनं |
| (१०६) | २ | (संसाराकडे | (संसाराकडे) |
| (१२३) | ९ | विसंयुनं | विसंयुत्तं |
| (१२४) | ८ | अवथंकथी | अकथंकथी |
| (१२५) | ५ | मुक्त | मुक्त |
| (१२७) | १२ | गंदितो | मादितो |
| (१२७) | १४ | आपल्या | आपल्या |
| (१२८) | ८ | यद्धः | बुद्धः |
| (१२८) | १४ | बुद्धी | बुद्धो |
| (१२८) | १५ | राज्य | राज्ये |
| (१३२) | १८ | नाहीय | नाहीत |
| (१३३) | २४ | दिपदुत्तमो | दिपदुत्तमो |
| (१३४) | २ | प्रचलित आहे. | प्रचलित आहे, |
| (१३५) | १९ | माती | याती |
| (१३७) | २२ | आहेव | आहेत |
| (१४०) | ११ | सम्बरथपराजिता | सम्बंधमपराजिता |

---

) "फट्' कहकर दाहिने हाथसे एक बारम कुश उखाड़—
करना विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
होता है— नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

# हृद्गत

१५ ऑगष्ट १९४७ हा दिवस भारताच्या इतिहासांत सुवर्ण अक्षरांनी लिहिला जाईल. याची कारणें दोन आहेत. एक तर त्या दिवशीं परकीय सत्तेचें जूं झुगारून भारत स्वतंत्र झाला आणि दुसरें कारण हें की, त्या दिवशीं भारतात भगवान् बुद्धाच्या आणि त्याच्या थोर शिकवणुकीच्या पुनरुत्थानाला मोठ्या प्रमाणांत चालना मिळाली, कारण भारताने आपल्या राष्ट्रध्वजांत भगवान् बुद्धाच्या धर्मचक्राला—ज्याला आपण 'अशोक चक्र' म्हणून संबोधितों—अग्रस्थान दिलें आहे. तसेंच भारताच्या राजमुद्रेत तीन सिंहासह त्याच धर्मचक्राला राजमान्यता मिळाल्यामुळे भगवान् बुद्ध आज आमच्या लोकसत्तात्मक गणराज्याचे गणपति आहेत ही गोष्ट कोणीहि नाकबूल करूं शकत नाही. ह्याचा अर्थ हा की आज आमच्या लोकनियुक्त पुढाऱ्यांना ही गोष्ट पटली आहे की भगवान् बुद्ध हे सदा सर्वदा भारताकरिता स्वातंत्र्य आणि सुख, शांति व समृद्धीचें प्रतीक आहेत. ह्यावर जर कोणी अशी शंका काढील की बुद्धाच्या अहिंसेमुळे भारत निस्तेज, दुर्बल व गुलाम बनला तर त्याला एवढीच आठवण करून देणें पुरे आहे की त्याच अहिंसेच्या बळावर आपल्या समक्ष महात्मा गांधींनी आपल्याला स्वातंत्र्य मिळवून दिलें आहे. म्हणून अहिंसेमुळे भारताचें अकल्याण झालें हें म्हणणे वस्तुस्थितीला धरून नाही. अहिंसा ही केव्हाहि शूरांचें शस्त्र आहे आणि तुकाराम महाराज म्हणतात त्याप्रमाणे 'तुका म्हणे तेथे पाहिजे जातीचे। येऱ्या गबाळाचे काम नव्हे'. म्हणून ह्या वरून हें स्पष्ट होतें की भारताचें जें पतन झालें तें बुद्धाच्या अहिंसेमुळे नव्हे तर आम्ही बुद्धाला व त्याच्या खऱ्या

शिकवणुकीला विसरलों म्हणून. आज आमचा इतिहास आम्हाला साक्ष देतो की जोपर्यंत भारतांत बुद्धाला स्थान होतें तोपर्यंत भारत स्वतंत्र होता, सुखी होता, समृद्ध होता आणि जगाचें सांस्कृतिक केन्द्र होता. पश्चातीत इतिहासकार एकमुखाने अशोक काळाला भारताचें सुवर्णयुग म्हणतात ना ? कां ? कारण त्यावेळीं भारत उन्नतीच्या शिखरावर होता. तो कशामुळे ? त्यावेळीं बुद्ध हा भारताचा आदर्श होता म्हणून. वास्तविक बुद्धाच्या शिकवणुकीमुळे आपल्यामध्ये एकीची आणि राष्ट्रीयत्वाची भावना टिकूं शकते. आणि आज स्वातंत्र्यप्राप्ती-नंतर जर भारताला कशाची नितान्त आवश्यकता असेल तर ती ही भावना टिकविण्याची. जातीयता ही राष्ट्रीयतेच्या मार्गांतली सर्वांत मोठी धोंड आहे. वास्तविक राष्ट्रीयता आणि जातीयता ह्या दोन्ही गोष्टी एकाच वेळीं एकाच ठिकाणीं नांदूं शकत नाहीत. राष्ट्रीय वृत्तीचा अभाव म्हणजेच जातीयता; आणि म्हणून जातीयवादी अथवा सांप्रदायिक लोक राष्ट्रीय वृत्तीचे राहूं शकत नाहीत. कारण त्यांचा दृष्टिकोन नेहमी त्यांच्या जातीपुरताच सीमित असतो. आणि ह्याच कारणास्तव भारतीय गणराज्याच्या संविधानात सांप्रदायिकतेला अथवा जातीयतेला मुळीच स्थान नाही. वास्तविक आपलें संविधान म्हणजे मानवतेची एक सनदच आहे असें म्हटलें तरी चालेल. आज आपल्या थोर लोकांनी बुद्धाला आपला विनायक मानलें आहे, ह्याचें मुख्य कारण हें की बुद्ध हा आमच्यात प्रचलित असलेली जातीयता आणि तज्जन्य दुर्बलता नष्ट करून भारताला शक्ति प्रदान करितो आणि त्याला जगात प्रतिष्ठा मिळवून देतो. केवळ बुद्धाची जन्मभूमि म्हणून भारताला जो बौद्ध जगतांत मान मिळतो तो केव्हाहि स्पृहणीय आहे. जशी आपल्यांत एक परंपरा प्रचलित आहे की जर एखादा हिंदु मरणासन्न झाला तर त्याला सद्गति प्राप्त व्हावी म्हणून आपण त्याचे तोंडांत तुलसीदल किंवा गंगाजल टाकतो; तसेंच बौद्ध जगतांत अशी परंपरा प्रचलित आहे की मरणारास बौद्धाच्या तोंडांत भारताची (म्हणजे लुम्बिनी,

) "फट्' कहकर दाहिने हाथसे एक चारम कुश उखाड़—
. करना विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
ो है— नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

बुद्धगया, सारनाथ किंवा कुशीनगर ह्या स्थानांची) माती टाकतात. एवढेंच नव्हे तर बौद्ध धर्मग्रंथांत असें लिहिलें आहे की सत्य, न्याय आणि नीति हीं जर कोठे वास करीत असतील तर तीं ह्या पवित्र भारतांत. तर मग प्रश्न सहजच उद्‌भवतो की आमच्या भूमीला एवढें पावित्र्य कोणी मिळवून दिलें? अर्थात् नरश्रेष्ठ गौतम बुद्धाने. म्हणून आज जर आम्ही ही खरी परिस्थिति ओळखली नाही तर आम्ही आपल्या परिस्थितीचें यथार्थ अवलोकन केलें असें म्हणतां येणार नाही. आणि म्हणून बुद्धामुळे आम्हाला कोणकोणते फायदे मिळतात ह्या गोष्टीचा विचार करणें आवश्यक आहे. वास्तविक आपण जरी वर वर विचार केला तरी असें दिसून येईल की भारताला बुद्धामुळे दोन ठळक फायदे मिळतात. पहिला फायदा हा की बुद्धामुळे आमच्यांत प्रचलित असलेली जातीयता आणि तज्जन्य अस्पृश्यता नष्ट होऊन आमचा समाज सशक्त व एकजिनसी बनतो. तसें पाहिलें तर जातीशिवाय हिंदूच नाही. आणि ही जातीयता इतकी खोल रुजलेली आहे, की तिची मुळें खणून काढणें कांही सोपें काम नाही. काम जरी कठीण असलें तरी तें अशक्य नाही. कारण जगांत अशी कोणतीच वस्तू नाही की जी प्रयत्नाने साध्य होऊं शकत नाही. तुमचा प्रयत्नच यशापयशाची कसोटी आहे. तुकाराम महाराज म्हणतात त्याप्रमाणें ' निश्चयाचें बळ तुका म्हणे तेंचि फळ '. आणि म्हणून भारताची जनता जर ही जातीयता नष्ट करायला कटिबद्ध झाली तर ती नष्ट व्हायला किती वेळ लागणार?

सामाजिक विषमतेचें मूळ ह्या जातीयतेंत साठवलेलें असल्यामुळे जातीयता ही केंव्हाहि समाजस्वास्थ्याच्या दृष्टीने अनिष्ट आहे ही गोष्ट कोणीहि समाज-हितचिंतक नाकबूल करूं शकणार नाही. आणि म्हणूनच महाराष्ट्र सामाजिक परिषदेने तर आपल्या उद्दिष्टांत स्पष्टच म्हटलें आहे की वर्ण-विहीन व जाति-विहीन समाज निर्माण करणें हें महाराष्ट्र सामाजिक परिषदेचें उद्दिष्ट आहे. ह्यावरून ही गोष्ट सिद्ध होते की भारतीय जनतेला हें जातीयतेचें शल्य तीव्रतेने बोचत आहे.

कारण तिला आता हें कळून चुकलें आहे, की ही राष्ट्रघातकी जातीयता जर आपण नष्ट केली नाही तर हीच आपला नाश करील.

केवळ सामाजिक सुधारकांनीच ह्या जातीयतेवर हल्ला केला असें नाही. तर आपल्या महाराष्ट्रांतील प्रत्येक साधुसंताने ह्या सामाजिक विषमतेवर फार निष्ठुर प्रहार केला आहे. कारण समाजांत स्वास्थ्य नांदविणें ह्यावरच तर साधुसंतांनी भर दिला आहे. जो सर्व अन्यायाशीं निर्भयपणें व निष्प्रेम वृत्तीने भांडतो तोच खरा साधु. मात्र असें करतांना तो अन्यायी व्यक्तीला हात लावीत नाही. कांही लोकांचा असा समज होऊन बसला आहे की अंगाला राख लावून अरण्यात निघून जाणें हेंच साधुत्व आहे. ही तर केवळ पळवाट आहे. वास्तविक समाजांत राहून व स्वतः न्यायाने व नीतीने वागून इतरांना तसें वागण्याची प्रेरणा करणें ह्यातच खरें साधुत्व आहे. मग साधु समाजाच्या सुखदुःखापासून अलिप्त कसा राहूं शकतो ? ज्या समाजावर त्याची जीविका निर्भर असते त्या समाजापासून तो आपल्याला भिन्न कसा मानूं शकतो ? आणि म्हणून खरा साधू मोक्षसुखांतच मग्न नसून आपल्या जीवनातला प्रत्येक क्षण सामाजिक अन्यायाविरुद्ध भांडण्यात वेचतो. आणि म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात—'मोक्ष सुखा हाणूं लाथा भय नाही जन्म घेता॥' आता ह्या सामाजिक विषमतेचा प्रतिकार आपल्या साधुसंतांनी कसा केला हें आपण थोडक्यांत पाहूं. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात—'म्हणोनि कुळजाति वर्ण। हें अवघेंचि गा अकारण'. तसेंच तुकाराम महाराज म्हणतात—'वर्णधर्म हा खेळ'. म्हणून साधुसंतांचें बंड चातुर्वर्ण्याविरुद्ध होतें हें उघड आहे. आणि म्हणून ज्या वर्णव्यवस्थेच्या अथवा चातुर्वर्ण्याच्या नांवाखाली ही जातीयता आमच्या समोर उभी आहे ती वर्णव्यवस्थाच आज आपल्याला नष्ट करावयाची आहे. कारण जातीयता ही केवळ चातुर्वर्ण्याची छाया आहे. चातुर्वर्ण्यच जातीयतेचा आधारस्तंभ आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. आणि ह्या दृष्टीने आपल्याला ह्या प्रश्नाकडे पाहिलें पाहिजे. ह्यावर कांही वर्णाभि

फट्' कहकर दाहिने हाथसे एक बारम कुश उखाड़—
विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

-मानी लोक म्हणतील, 'आम्ही वर्ण मानतों जातीयता नाही.' ही नुसती पळवाट आहे. ह्या लोकांना जर तुम्ही विचारलें की काय हो चातुर्वर्ण्याच्या कल्पनेप्रमाणे तुकाराम महाराज कोण होते? तर हे जात्यन्ध बेधडक सांगतात की तुकाराम महाराज हे शूद्र होते. तुकाराम महाराज जर शूद्र असले तर त्यांच्याच भाषेत बोलावयाचें तर 'वर्णधर्म' हा खेळ आहे. आणि अनैतिक खेळ थांबविण्याची आज वेळ आली आहे. उलट काही लोक असा युक्तिवाद लढवितात की तुकाराम महाराज ब्राह्मणाच्याहि पलीकडे होते. ही सुध्दा पळवाटच आहे. कारण आपल्या शास्त्रांत साधुसंताचा पांचवा वर्ण सांगितलेला नाही. म्हणून चातुर्वर्ण्याच्या कल्पनेप्रमाणे तुकाराम महाराज ब्राह्मण आहेत हें एक निर्विवाद सत्य आहे.

मग खरा प्रश्न उपस्थित होतो तो हा की हा खेळ थांबविण्याचा उपाय कोणता? जातीयतेवर बुद्धाशिवाय दुसरें औषधच नाही हें एक निर्विवाद सत्य आहे. आणि म्हणूनच जातीयवादी लोकांचें बुद्धाशीं वावडें आहे. पण तसें पाहिलें तर आपण हिंदु लोक राम आणि कृष्णाप्रमाणे बुद्धाला ईश्वराचा अवतार मानतो. रामाचा ७ वा, श्रीकृष्णाचा ८ वा आणि बुद्धाचा ९ वा अशी ही अवतारपरंपरा आहे. राम आणि कृष्ण हे बुद्धाच्या अगोदरचे असल्यामुळे त्यांचें युग संपलें आहे आणि आज आपण बुद्धाचे युगांत राहतों ही गोष्ट विसरून चालणार नाही. प्रत्येक हिंदु पूजेचे वेळीं आपल्या संकल्पांत 'बुद्धावतारे' मंत्र म्हणून ह्या गोष्टीची सत्यता सिद्ध करितो. एकदा अवतार मानल्यानंतर मग म्हणणें की बुद्ध नास्तिक होते, अवैदिक होते बरोबर नाही. कारण आम्ही नास्तिकाला व अवैदिकाला अवतार कसें मानूं? आणि म्हणून बुद्धावर केलेले सर्व आरोप वृथा व अप्रामाणिक आहेत हे उघड आहे. कारण आमचें शास्त्र स्पष्ट सांगतें—

नमो वेदरहस्याय नमस्ते वेदयोनये ।
नमो बुद्धाय शुद्धाय नमस्ते ज्ञानरूपिणे ॥ (कूर्मपुराण)

शास्त्र इतकें स्पष्ट असतांना सुद्धा म्हणणें की बुद्ध हा अवैदिक होता, हें हास्यास्पद नाही काय ? ह्यावर कांही लोक म्हणतील की आम्ही ज्या बुद्धाला अवतार मानतों तो बुद्ध गौतम बुद्धाहून वेगळाच आहे. अशा लोकांना जर ह्या वेगळ्या बुद्धाचा इतिहास विचारला तर ते कानावर हात ठेवतात. खरी गोष्ट तर ही आहे की प्रामाणिक झोंप घेणाऱ्याला आपण झोपेतून जागवूं शकतों. पण मनुष्य जेव्हा झोपेचें ढोंग करितो तेव्हा त्याला कोण जागवूं शकतो ? गौतम बुद्धालाच आपण अवतार मानतों ही गोष्ट अगदी वादातीत आहे. आपल्या शास्त्रात स्पष्ट म्हटलें आहे—

शुद्धोदनस्य पुत्रोऽभूत् स्वयं पुनो जनार्दनः ।
त्यक्त्वा राज्यं स्त्रीयं सोऽथ गति परमकां गतः ॥

इतकें असूनहि जर कांही दुराग्रही लोक असा अट्टाहासच धरतील की गौतम बुद्धाला आम्ही मानीत नाही तर गोष्ट निराळी. पण येथे प्रश्न हा आहे की ज्या बुद्धाला हिंदु लोक अवतार मानतात तो बुद्ध गौतम बुद्धाहून निराळा आहे काय ? वास्तविक गौतम बुद्धाशिवाय दुसरा ऐतिहासिक बुद्धच नाही. जो गौतम बुद्ध भारताचा गौरव आहे, अभिमान आहे, ज्याने "कृण्वन्तो विश्वमार्यम्" ही वेदोक्ति खरी केली, अशा पुरुषोत्तमालाच नेमकें आम्ही आपल्या महापुरुषाच्या मालिकेंतून वगळावें हें केवढें अन्याय्य आहे एवढेंच ह्या ठिकाणीं मला सांगावेंसें वाटतें.

ह्यावर कांही बुद्ध–भक्त म्हणतील की कां हो ही अवताराची कल्पना कोठून आणली ? बौद्ध लोक तर ईश्वरहि मानीत नाहीत व अवताराची कल्पनाहि मानीत नाहीत. मग तुम्ही भलत्या सलत्या गोष्टी येथे कशाला सांगतां ? ह्यावर माझें असें म्हणणें आहे की हिंदूंचा बुद्धाकडे पाहण्याचा जो एक दृष्टिकोन आहे त्याच दृष्टिकोनाने मी ह्या प्रश्नाचा विचार करीत आहे. मी हिंदूंचा दृष्टिकोन बौद्धावर लादत नाही. तसेंच बौद्धांनी सुद्धा आपला दृष्टिकोन इतरांवर न लादण्याची कृपा करावी. हिंदूंना बुद्धाकडे आपल्या स्वतंत्र दृष्टिकोनाने बघण्याचा

फट्' कहकर दाहिने हाथसे एक बारम कुश उखाड़—
विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

पूर्ण अधिकार आहे, असा बौद्धांना आहे. म्हणून वरील बौद्धांचा आक्षेप आगान्तुकच आहे. हिंदूंनी बुद्धाकडे कसें पाहावें हा केवळ हिंदूंचाच प्रश्न आहे आणि बौद्धांना त्यांत हस्तक्षेप करण्याचा कोणताहि अधिकार पोचत नाही.

बुद्धामुळे भारताला जो दुसरा फायदा मिळतो तो हा की बुद्धामुळे भारताला जगांत एक विशिष्ट स्थान मिळतें. आपण वर पाहिलेंच आहे की बुद्धाची जन्म-भूमि म्हणून बौद्ध लोक भारताला जगांतील सर्वश्रेष्ठ पवित्रभूमि मानतात. आणि हिंदूंनी सुद्धा जर बुद्धाविषयी आपला अव्यक्त आदर प्रगट केला तर दुधांत साखर पडल्यासारखें होईल, आणि त्यामुळे आपलें व बौद्ध जगताचें नातें अधिक दृढ होईल. तसें पाहिलें तर बुद्धामुळे भारताला जगांत जास्त मित्रच लाभतात. कारण बुद्धाने मैत्रीभावाचाच प्रचार केला आहे. म्हणून अशोकाने निर्माण केलेल्या बुद्ध साम्राज्याचा पाया मजबूत राहावा अशी जर हिंदूंची इच्छा असेल तर त्यांनी आज आपल्या जीवनात बुद्धाला त्याचें योग्य स्थान दिलें पाहिजे. जगांत मैत्रीभाव निर्माण करण्याकरिता बुद्धाचें पंचशील किती प्रभावी साधन आहे ह्याची प्रचीति आम्हा सर्वांना पूर्णपणे आलेलीच आहे. आणि त्याच्याच बळावर आज भारताची प्रतिष्ठा जगांत सारखी वाढत आहे. फेब्रुवारी १९५६ मध्ये अमृतसर येथे अखिल भारतीय कांग्रेस समितीने तर भगवान् बुद्धाच्या शिकवणुकीची आज नितान्त आवश्यकता आहे असा ठराव पास करून खरोखर अमृतच दर केलें आहे.

आज भारतांत सर्वत्र भगवान् बुद्धाविषयी आणि त्याच्या थोर शिकवणुकीविषयी सामान्य जनतेंत आदर निर्माण होत आहे, ही गोष्ट कोणीहि भारतीय नाकबूल करूं शकत नाही. अशा परिस्थितींत भगवान् बुद्धाच्या उपदेशाविषयी सामान्य जनतेंत जिज्ञासा निर्माण होणें स्वाभाविकहि पण आहे. ह्या जिज्ञासेची अंशतः पूर्ति करण्याकरिता धर्मपदाचें मराठींत भाषांतर करण्याचें मी ठरविलें आणि दुसरें कारण हें की

भगवान् बुद्धाची २५०० वी जयंती १९५६ च्या मे महिन्यांत येत आहे. ही बुद्धजयंती म्हणजे एक राष्ट्रीय महापर्वच आहे असें म्हटलें तरी चालेल, कारण ही बुद्धजयंती भारत सरकार एक राष्ट्रीय महोत्सव म्हणून साजरा करीत आहे ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. ह्या उत्सवानिमित्त भारत सरकार लाखो रुपये खर्च करीत असून एकट्या दिल्लींत निर्माण होणाऱ्या बुद्धाच्या स्मारकाकरिता भारत सरकारने दहा लक्ष रुपये खर्च करण्याचा संकल्प केला आहे. बौद्ध जगत् सुद्धा ह्या उत्सवांत फार उत्साहाने भाग घेणार आहे. कारण, बौद्धांचा असा विश्वास आहे की भगवान् बुद्धाच्या महापरिनिर्वाणानंतर २५०० वर्षांनी बौद्ध धर्माची विजयी दुंदुभि जगात सर्वत्र वाजेल. अशा ह्या शुभ प्रसंगीं माझे हातून भगवान् बुद्धाची अल्पशी सेवा म्हणून मराठी वाचकांकरिता धर्मपदाचें हें भाषांतर सादर करण्यांत मला अत्यन्त हर्ष होत आहे. भगवान् बुद्धाचें वचन पालीभाषेंत असल्यामुळे व मी पाली-भाषा-पंडित नसल्यामुळे भाषांतरांत चुका असण्याचा संभव आहे. वाचक वर्ग तिकडे क्षमाशील दृष्टीने पाहील व शब्दार्थावर जोर न देतां भावार्थावर जोर देईल अशी आशा आहे. माझे मित्र श्री. लक्ष्मण रामचंद्र कुळकर्णी, एम्. ए., विश्वविद्यालयांतील पालीचे प्राध्यापक यांनी हें भाषांतर तपासून मला उपकृत केलें आहे.

अग्नि जसा केवळ अग्निपूजकांचाच नसून समस्त मनुष्यमात्राचा आहे, तद्वतच धर्मपद जरी बौद्ध धर्मग्रंथ असला तरी तो एक महान विश्वग्रंथ आहे.

धर्मपद बौद्धांची गीता आहे. बौद्ध धर्मग्रंथ तीन भागात वाटले गेले आहेत. आणि म्हणून त्यांना त्रिपिटक अथवा तीन पेटारे म्हणतात. सुत्तपिटक, विनयपिटक व अभिधम्मपिटक त्यांना त्रिपिटक ही संज्ञा आहे. सुत्तपिटकांत भगवान् बुद्धाचा उपदेश दिलेला आहे. सुत्तपिटकांतील खुद्दक निकायांतला धर्मपद एक ल्हानसा ग्रंथ आहे. खालील तक्त्यावरून धर्मपदाचें त्रिपिटकांतील स्थान स्पष्ट होईल.

फट्' कहकर दोनों हाथस एक बारम पुरा उठाइ—
विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
है— नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

त्रिपिटक




धर्मपद ग्रंथ जरी आकाराने लहान असला तरी योग्यतेने लहान नाही. वास्तविक धर्मपद हें एक अनमोल रत्नांची खाण आहे. धर्मपद हें नांवच किती सूचक आहे! धर्मपद म्हणजे धर्माचें पाऊल अथवा मार्ग. धर्म म्हणजे सत्य, न्याय व नीतियुक्त आणि पद म्हणजे

मार्ग आणि म्हणून धर्मपदाचा सर्व भर आचरणावर आहे. कारण मार्ग हा केव्हाहि चालण्याकरिताच असतो. त्यावर तुम्ही घर बांधूं शकत नाही. धर्मपद हें अगदी सरळ व सोप्या भाषेंत लिहिलेलें आहे. वास्तविक धर्मपदाइतका सोपा, सरळ, तर्कशुद्ध, बुद्धिगम्य व उन्नतिकारक ग्रंथ तुम्हाला क्वचितच आढळेल. धर्मपद सोपें आहे याचा अर्थ हा नव्हे की तें आचरणाला सोपें आहे. धर्मपदाप्रमाणे आचरण करणें काही सोपें काम नव्हे. एकदा तुम्ही तरवारीच्या धारेवरून जाऊं शकाल पण धर्माप्रमाणे पाऊल टाकूं शकणार नाही. दुसऱ्याला जिंकणें हें केव्हाहि सोपें आहे; पण स्वतःला जिंकणेंच सर्वांत कठीण आहे. आणि धर्मपदाचा सर्व भर स्वतःला जिंकण्यावरच आहे. एकदा एका चीनच्या बादशाहाने एका बौद्ध भिक्षूला धर्माचें सार थोडक्यांत सांगण्याची विनंती केली. त्यावर त्या भिक्षूने धर्मपदांतील खालील श्लोक त्याला सांगितला (श्लोक १८३)

> सब्ब पापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा ।
> सचित्त परियोदपनं एतं बुद्धानसासनं ॥५॥ (बुद्ध-वग्ग)

ह्यावर तो बादशहा उद्गारला, ‘ हें तर फार सोपें आहे. ’ पण हें आचरणात आणणें किती कठीण आहे याची प्रतीति त्या बादशहाला त्याच्या जीवनांत क्षणोक्षणीं येऊं लागली. धर्मपद बुद्धिगम्य आहे. ह्याचे मुख्य कारण हें की बुद्ध हा मनुष्याशीं नेहमी मनुष्य ह्या नात्याने बोलतो. ‘ मी ईश्वराचा प्रेषित आहे ’ असा दावा बुद्धाने कधीच केला नाही. उलट तो मनुष्यमात्रांना सांगतो:—“ बाबांनो, मी सुद्धा तुमच्यामधील व तुमच्यासारखाच एक आहे; पण मी आपल्या प्रयत्नाने आपली तृष्णा नष्ट केली व त्यामुळे सुखी बनलो; तुम्ही सुद्धा जर आपली तृष्णा स्वप्रयत्नाने नष्ट कराल तर तुम्ही सुद्धा माझ्यासारखेच सुखी व्हाल. ” मनुष्य सुखी होण्याकरिता ईश्वरी कृपेची आवश्यकता कशाला ? मनुष्याचें सुखदुःख त्याच्याच हातात आहे. हीच बुद्धाची शिकवण

फट्' कहकर दाहिने हाथसे एक चारम पुरा उठाए़—

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

आहे. उदाहरणार्थ, श्लोक ७ व ८ पहा. श्लोक ७ मध्ये भगवान् बुद्ध म्हणतातः—

"जो पुरुष रागदृष्टीने वावरतो, जो इन्द्रियांना लगाम लावीत नाही, जो भोजनीं उचित मात्रा जाणीत नाही, जो आळशी, वीर्यहीन आहे, अशा मनुष्याला कामदेव त्याचप्रमाणे पदच्युत करितो, ज्याप्रमाणे सोसाट्याचा वारा दुर्बल झाडाला."

ह्याच्या उलट श्लोक ८ मध्ये म्हटले आहेः—

"जो पुरुष वैराग्य दृष्टीने वावरतो, जो इन्द्रियांना ताब्यांत ठेवतो, जो भोजनीं उचित मात्रा जाणतो, जो श्रद्धायुक्त व उत्साहशील आहे अशा पुरुषाला ज्याप्रमाणे सोसाट्याचा वारा पर्वताला हालवूं शकत नाही त्याप्रमाणे कामदेव भ्रष्ट करूं शकत नाही." पहिल्या श्लोकांत आसक्ति ठेवून वागणाऱ्या मनुष्याचें जीवन कसें निरर्थक असतें हें दाखविलें आहे तर दुसऱ्या श्लोकांत अनासक्त जीवन कसें प्रभावी असतें हें दाखविलें आहे. दुसऱ्या श्लोकांत व तुकाराम महाराजांच्या "युक्तीचा आहार नीतीचा व्यवहार। वैराग्य हे सार तरावया" ह्या अभंगात किती साम्य आहे हें चटकन लक्षात आल्याशिवाय राहत नाही. वरील दोन श्लोकांवरून धर्मपद समजण्याला किती सोपें आहे याची यथार्थ कल्पना वाचकांना सहज येण्यासारखी आहे. तें सोपें आहे याचें एक कारण हेंहि आहे की त्यांत कोणतेंहि सांप्रदायिक तत्त्वज्ञान अथवा परंपरागत सिद्धांत प्रतिपादिलेला नाही; त्यांत कल्पनेच्या हवेंत किल्ले बांधलेले नाहीत;... त्यांत शब्दांचें अवडंबर नाही; त्यांत पांडित्य नाही, शब्दजाल नाही. सर्वसाधारण मनुष्याला त्याच्या प्रत्यक्ष जीवनांत जे अनुभव येतात त्या अनुभवाच्या आधारावरच 'धर्मपदाचा' पाया रचलेला आहे. आणि म्हणून "या आणि पहा" हें सांगणारा जर कोणता धर्मग्रंथ असेल तर तो धर्मपद होय. येथे अन्धश्रद्धेला मुळीच स्थान नाही, मुळींच वाव नाही. वास्तविक बुद्धाने मनुष्याला रुढी व अंधप्रामा-

ष्याच्या कातरींतून मुक्त करून त्याला संपूर्ण मानसिक स्वतंत्रता दिली आणि हीच बुद्धाची जगाला खरी देणगी आहे.

ज्याच्या इच्छेशिवाय झाडांचें पान सुद्धां हालूं शकत नाही व जो जगाचा निर्माता व नियंता आहे अशा सर्वशक्तिमान् ईश्वराला धर्मपदांत कोठेच स्थान नाही. ईश्वरच जर सर्व कांही करितो तर मग जगांत पाप–पुण्य, धर्म–अधर्म, न्याय–अन्याय, इहलोक–परलोक ह्यांना स्थानच रहत नाही. उलट बुद्ध आम्हाला सांगतो की, मनुष्याची तृष्णाच जगांतील सर्व अनर्थांचें कारण आहे. ईश्वराच्या प्रेरणेने व इच्छेनेच जर ॲटम बॉम्बचा वर्षाव होत असेल तर मनुष्य त्याला दोष कसें देऊं शकेल ? उलट धर्मपद आम्हाला सांगतें—

न हि वेरेन वेरानि सम्मन्तीध कुदाचनं ।
अवेरेन च सम्मन्ति एस धम्मो सनन्तनो ॥५॥

आणि हीच शिकवण व विचारसरणी आज ॲटम बॉम्बला खरें उत्तर आहे. ज्या द्वेषामुळे मनुष्य हें निष्ठुर कृत्य करायला प्रवृत्त होतो तो द्वेषच आपल्यांतून काढून टाकण्यावर बुद्धाचा भर आहे. वास्तविक ही शिकवण एक दुधारी तलवार आहे.

हिंसक वृत्तीवर प्रहार करून प्रहार सहन करण्यास देखील ती मनुष्यास प्रवृत्त करिते. आणि म्हणून हीच शिकवण हिंसक जगांत मनुष्याला आशेचा अमर किरण आहे. मारणारा खरा शूर नसून मार सहन करणाराच खरा शूर होय, हें या शिकवणुकीचें सार असल्यामुळे या शिकवणुकीवर ज्यांचा दृढ विश्वास आहे असे लोक हिंसेला हिंसेने उत्तर देऊंच शकत नाहीत आणि म्हणून जगांतील हिंसा कमी करण्याचा हाच एकमेव उपाय आहे हें कोणालाहि कबूल करावें लागेल; कारण हिंसेला जर हिंसेनेच बुद्धी उत्तर दिलें तर हिंसा थांबून शकत नाही उलट ती वाढेल.

फट् कहकर दाहिन हाथसे एक चारन पुष्प चढावे—
विरिञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

बुद्धाचें अंतरंग तसेंच त्याचें बहिरंग हें खडीसाखरेच्या खड्या-प्रमाणे कसें गोडच गोड आहे ह्याची जाणीव धम्मपद वाचणाराला पदोपदीं होते. उदाहरणार्थ, श्लोक १८४ मध्ये बुद्ध म्हणतात, "दुसऱ्याची हिंसा करणारा व दुसऱ्याना त्रास देणारा प्रव्रजित खरा संन्यासी होऊं शकत नाही. धर्मपद हें बुद्धाचें अंतरंग असल्यामुळे 'सत्यं-शिवं-सुंदरं'ने परि-पूर्ण आहे व वाचणारा अगदी अक्षरशः वर उचलला जातो. उदाहरणार्थ, बुद्ध म्हणतात —

त तो मला मलतरं अविज्जा परमं मलं ।
एतं मलं पहत्वान निम्मला होथ भिक्खवो ॥ धर्मपद २४३

ह्या एकाच श्लोकात सर्व धर्मांचें सार साठविलेलें आहे आणि म्हणून 'धर्मपद' सत्यं ने परिपूर्ण कसें आहे ह्याची जाणीव कोणालाहि सहजच होते. तसेंच

'धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च' । धर्मपद १६८.
अक्कोधेन जिने कोधं असाधुं साधुना जिने ।
जिने कदरियं दानेन सच्चेन अलिक वादिनं ॥ धर्मपद २२३

ह्यावरुन धर्मपद 'शिवं'ने परिपूर्ण कसें आहे हें स्पष्ट होतें. आणि

चन्दनं तगरं वापि उप्पलं अथ वस्सिकी ।
एतेसं गन्ध जातानं सीलगन्धो अनुत्तरो ॥ धर्मपद ५५.

ह्यावरुन धर्मपद 'सुंदरं'ने परिपूर्ण कसें आहे याची प्रचीति येते. वास्तविक ह्या श्लोकांतील भावार्थ व उपमा किती सुंदर व प्रभावी आहेत हें सांगण्याची काही आवश्यकता नाही.

धर्मपदाचें खरें वैशिष्ट्य हें की त्यात सुरवातीपासून तो शेवटपर्यंत अहिंसेचेंच समर्थन केलेलें आहे. हिंसेचें कोठेच समर्थन केलेलें नाही. आणि म्हणून त्यात तुम्हाला हिंसेची व अहिंसेची खिचडी केलेली आढळणार नाही. कारण बुद्ध स्पष्ट शब्दांत सांगतात की निर्वाणाचा मार्ग

एक आणि ऐहिक सुखाचा मार्ग दुसरा (धर्मपद ७५). धर्मपदांत अहिंसेवरच जोर दिला असल्यामुळे तें जगांतील एक सर्वोत्कृष्ट पुस्तक समजलें जातें. धर्मपदाला समस्त जगांत जें एक आदराचें स्थान मिळतें तें केवळ तो एक बौद्ध धर्मग्रंथ म्हणून नव्हे तर जगांतील समस्त वाङ्मयांत तो एक अनमोल ग्रंथ आहे म्हणून. एखाद्या गैर-सांप्रदायिक शान्तिसाधकाला अथवा मुमुक्षूला जर जगांतील समस्त वाङ्मयांतून एकच आणि केवळ एकच पुस्तक निवडण्याची संधि दिली तर मी विश्वासानें सांगू शकतों की तो धर्मपदाचीच निवड करील आणि म्हणूनच धर्मपदाची थोरवी वर्णन करतांना श्री आल्बर्ट जे. एडमन्ड्स आपल्या धर्मपदाच्या भाषांतराच्या प्रस्तावनेंत म्हणतो, "आशिया खंडांत जर एखाद्या अमर धर्मग्रंथाची निर्मिति झाली असेल तर ती धर्मपदाची होय." तसेंच डॉ. मॉरीस ब्लूमफील्ड यांनी "धर्मपद हा समस्त हिंदु वाङ्मयात कदाचित अत्यन्त सुंदर व प्रसादयुक्त शब्दांनी परिपूर्ण असा ग्रंथ आहे" असे गौरवपूर्ण उद्गार काढलेले आहेत. ह्यावरून हें स्पष्ट होतें की धर्मपद सर्वांगसुंदर असा एक धर्मग्रंथ आहे.

जग हें दुःखः आहे हें पहिलें आर्य सत्य सांगण्यात बुद्धानें जगांत नैराश्याचा प्रचार केला असा एक आरोप कांही लोक बुद्धावर करितात. जग हें दुःखमय आहे हें सांगण्यांत बुद्धानें कांही नवीन गोष्ट सांगितली नाही. जग हें दुःखमय आहे ही गोष्ट कोण कबूल करणार नाही ? प्रिय वस्तूंचा वियोग दुःख आहे; अप्रिय वस्तूंचा संयोग दुःख आहे; इच्छित वस्तु न मिळणें दुःख आहे; ह्या गोष्टींनीच तर जग भरलेलें आहे असा अनुभव प्रत्येक मनुष्याला क्षणोक्षणीं येतो. श्रीकृष्ण सुध्दा तर गीतेंत हीच गोष्ट सांगतात. ते म्हणतातः—

'अनित्यं असुखं लोक इमं प्राप्य भजस्व मां'

तसेंच संतश्रेष्ठ तुकाराम महाराज म्हणतात, "दुःखासि कारण जन्म घेणें." मग भगवान् बुद्धानें नवीन काय सांगितलें? वास्तविक भगवान्

फद् फदकर दोहन हायस एक वारम पुरा ...

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

बुध्द जर येथेच थांबले असते तर कदाचित केलेल्या आरोपांत कांही तथ्य आहे असें म्हणतां आलें असतें. पण भगवान् बुध्द तर स्पष्ट शब्दांत सांगतात की हें दुःख सकारण आहे आणि ह्याचा अंत होवूं शकतो. ह्या दुःखाचें कारण अविद्या अथवा तृष्णा आहे असें भगवान् बुध्दाचें म्हणणें आहे. आणि मनुष्याने जर ह्या अविद्येचा अथवा तृष्णेचा नाश केला तर तो दुःखापासून मुक्त होवूं शकतो. आणि दुःखाचा नाश म्हणजेच परम सुखप्राप्ति. वास्तविक दुःखाला दुःख समजणें हाच सुखाचा एकमेव मार्ग आहे. भगवान् बुध्दाचें निर्वाणपद परम सुखदायक आहे हें धर्मपदावरून स्पष्ट होतें. कारण भगवान् बुध्द म्हणतातः—"निब्बानं परमं सुखं" आणि म्हणून भगवान् बुध्दाने नैराश्याचा प्रचार केला हें म्हणण्यांत प्रामाणिकपणाचा अभाव आहे हें उघड आहे. जो भगवान् बुध्द सत्याचें प्रत्यक्ष स्वरूप आहे तो नैराश्यवादी कसा राहूं शकतो ?

सर्वसाधारण हिंदूच्या मनांत बुध्दाच्या अनात्मवादाविषयीं बराच गैरसमज निर्माण झालेला दिसतो, आणि म्हणून ह्या ठिकाणीं बौध्द–तत्त्वज्ञान काय होतें ह्याचा विचार करणें आवश्यक आहे.

## बौद्ध तत्त्वज्ञान*

भगवान् बुध्द आपल्या अमर संदेशांत भिक्षूंना म्हणतात— "कुल्लूपमं वो भिक्खवे धम्मं देसिस्सामि नित्थरणत्थाय नो गहणत्थाय" हे भिक्षूंनो, मी तुम्हाला नावेप्रमाणे धर्म उपयोगाकरिता देतों; धरून बसण्याकरिता नव्हे. ह्यावरून हें स्पष्ट होतें की धर्म ही केव्हाहि आचरणाची बाब आहे; शुष्क तर्क, सिद्धांत, परंपरा अथवा मिथ्या अवडंब-

* 'बौध्द तत्त्वज्ञान' हें माझें भाषण ता. २७–३–५५ रोजीं नागपूरच्या नभोवाणी केन्द्रावरून प्रसारित झालें होतें, ते त्या केन्द्राच्या सौजन्याने येथे छापण्यांत येत आहे.

राची नव्हे. धर्म म्हणजे मनुष्याने आपल्या व्यवहारांत सत्य, न्याय व नीति ह्यांना स्थान देणें. कारण जोपर्यंत मानवी जीवनांत सत्य, न्याय व नीति ह्यांना स्थान मिळणार नाही तोंपर्यंत मानवी जीवन सुखीच होऊं शकत नाही, आणि म्हणून धर्म हें सुखाचें एकमेव साधन आहे, असें म्हणणें अनुचित होणार नाही.

बुध्दगयेंत बुध्दत्व प्राप्त झाल्यावर बुध्दाने जवळजवळ ४५ वर्षे जगाला धर्माचाच उपदेश केला आणि त्याचा समाजावर प्रभावहि पण पडला. त्याचें मुख्य कारण हे की, बुध्द हे स्वतः उपदेशाप्रमाणे वागत आणि म्हणूनच " बोले तैसा चाले त्याची वंदावी पाऊलें " ह्या तुकाराम महाराजांच्या वचनाप्रमाणे बुध्दाच्या उपदेशाचा समाजावर प्रभाव पडणें स्वाभाविकहि पण होतें. इतिउत्तकांत बुध्द म्हणतात— 'यो धम्मं पस्सति सो मं पस्सति'—जो धर्माला पाहातो तो मला पाहातो. ह्यावरून हें स्पष्ट होतें की बुध्दाचें जीवन धर्ममय झालें होतें, सत्यमय झालें होतें.

जोपर्यंत बुध्द जिवंत होते तोपर्यंत त्यांचा उपदेश काय होता ह्यासंबंधी वादच निर्माण झाला नाही. कारण एखादी गोष्ट धर्म्य आहे किंवा नाही, असला प्रश्न उपस्थित झालाच तर त्याला उत्तर देण्यास बुद्ध समर्थ होते. पण बुद्धाचे मरणानंतर धर्मच शास्ता बनल्यामुळे धर्म काय आहे हें अधिकृत रीत्या सांगण्याची आवश्यकता कांही बुद्धानुयायांना भासणें स्वाभाविक होतें. ह्या दिशेने पहिलें पाऊल म्हणजे बुद्धाच्या मरणानंतर २१ दिवसांनी राजगृह येथे भरलेली धर्मपरिषद. हिलाच प्रथम संगीती म्हणतात. ह्या परिषदेंत धर्माचा व विनयाचाच विचार करण्यांत आला. ह्या ठिकाणी आपल्याला हें लक्षांत ठेवलें पाहिजे की, बुध्दाने जो वेळोवेळीं उपदेश दिला त्याला धर्म व भिक्षुसंघाकरिता आचरणार्थ त्याने जे नियम केले त्या नियमांना विनय म्हणतात. ह्यानंतर दुसरी संगीती बुध्दाच्या मरणानंतर १०० वर्षांनी वैशालींत

फट्' कहकर दाहिन हाथसे एक बार ...

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
मुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

भरली होती. त्या परिषदेंत मुद्दा धर्माचा व विनयाचाच विचार करण्यांत आला. तिसरी संगीती सम्राट अशोकाचे वेळीं पाटणा येथे इ. स. पू. २५३ मध्ये भरली होती. ह्या संगीतींत मुध्दा धर्माचा व विनयाचाच विचार करण्यांत आला. सम्राट अशोक हा बुध्दप्रेमी असल्यामुळे बौध्द धर्माच्या प्रसारार्थ त्याने भिन्न भिन्न देशांत धर्मप्रचारक पाठविले होते. लंकेंत त्याने आपला मुलगा नामें महेन्द्र व मुलगी नामें संघमित्रा ह्यांना धर्मप्रचारार्थ पाठविलें होतें. त्यामुळे लंका हें बौध्द धर्माचें व विशेषेंकरून हीनयान पंथाचें केन्द्र बनलें. यानंतर इ. सनाच्या पहिल्या शतकांत म्हणजे बुध्दाच्या महापरिनिर्वाणानंतर ५००-६०० वर्षांनी लंकेंतच पाली भाषेंत त्रिपिटक लिहिण्यांत आलें.

बौध्द धर्मीयांत दोन पंथ आहेत. एक महायान व दुसरा हीनयान. महायान म्हणजे मोठा रस्ता व हीनयान म्हणजे लहान रस्ता. जे लोक बुध्दाला आदर्श मानून यथाशक्ति बुध्दत्वाकडे जाण्याचा प्रयत्न करितात अशांना 'महायानीय बौध्द' म्हणतात. उत्तरेंत अश्वघोष व दक्षिणेंत माध्यमिक तत्त्ववेत्ता नागार्जुन हे आचार्यद्वय महायानपंथाचे संस्थापक होते. नागार्जुनाचा जन्म विदर्भात झाला होता. नागपूरपासून तीस मैलांवर रामटेकजवळ ज्या नागार्जुन गुहा आहेत, त्या ह्याच नागार्जुनासंबंधी आहेत ही गोष्ट सुप्रसिध्दच आहे. मला तर पुष्कळदा असें वाटतें की, नागपूर हें नांव ह्या पुरातन शहराला नागार्जुनामुळेच प्राप्त झालें असावें. असो. हीनयान पंथीय बौध्दाचें असें मत आहे की, बुध्दत्वप्राप्तीकरिता मनुष्याला भिक्षुनियमांचें पालनच केलें पाहिजे. त्रिपिटक हे हीनयान पंथाचे प्रमाण धर्मग्रंथ आहेत ही गोष्ट आपल्याला ह्या ठिकाणी विशेष लक्षात ठेवली पाहिजे. त्रिपिटक म्हणजे तीन पेटारे. सुत्त, विनय व अभिधम्म ह्यांना त्रिपिटक ही संज्ञा आहे. सुत्त पिटकांत बुध्दाचा आणि त्याच्या प्रमुख शिष्याचा उपदेश, विनय पिटकांत भिक्षुसंघाच्या आचारविचारांचा संग्रह आणि अभिधम्म पिटकांत बौध्द

तत्त्वज्ञानाची तात्त्विक मीमांसा केलेली आहे. अभिधम्म पिटकांत प्रत्यक्ष बुध्दवचनें मुळीच नाहीत म्हटलें तरी चालेल. वास्तविक अभिधम्म पिटक हें बुध्दाचा धर्मसेनापति सारिपुत्र ह्याने श्रावस्ती येथे ५०१ भिक्षूंना सांगितलें अशी आख्यायिका आहे. आणि म्हणूनच, सुत्त पिटक हेंच मूळ बुध्दाच्या उपदेशाचा यथार्थ परिचय करून देणारें अत्यन्त प्राचीन वाङ्मय असल्यामुळे विशेष महत्वाचें ठरतें. व तेंच बौध्द धर्माचें अंतरंग अथवा सार आहे हें उघड आहे. अभिधम्म हा शब्द भगवान् बुध्दाच्या वचनांत कोठेच आढळत नाही. उलट मरतेसमयीं बुध्दाने आनंदाला जो शेवटचा उपदेश दिला त्यांत तर त्यानी स्पष्टच म्हटलें आहे की, धर्मच तुमचा शास्ता अथवा गुरु असूं द्या. तसेंच पहिल्या तिन्ही संगीतींत अभिधम्माचा उल्लेख सुध्दा नाही. ह्यावरून अभिधम्माची कल्पना नंतरची आहे हें सिध्द होतें. अभिधम्म म्हणजे विशेष धर्म म्हणजेच धर्मांची तात्त्विक मीमांसा. सुत्तपिटकावरून हें स्पष्ट होतें की, बुध्दाने कोणतेंच तत्त्वज्ञान प्रतिपादिले नाही. त्याचा सर्व भर धर्मा-चरणावर होता. व जे जे वाद सदाचाराच्या अथवा चित्तशुद्धीच्या आड येत त्यांचें ते खंडन करीत.

बौद्ध तत्त्वज्ञान काय होतें ह्याची यथार्थ कल्पना येण्याकरिता आपल्याला सर्वप्रथम बुध्दाच्या जीवनाची स्पष्ट कल्पना आली पाहिजे. ह्या दृष्टीने आपण बुध्दाच्या जीवनाचे दोन भाग करूं शकतों. जन्मापासून तों गृहत्यागापर्यंतचा पहिला भाग अथवा पूर्वार्ध व गृहत्यागानंतर तों त्यांच्या मृत्यूपर्यंतचा दुसरा भाग अथवा उत्तरार्ध. गौतमाचें गृहत्यागापर्यंतचें जीवन एक मानवी जीवन असल्यामुळे काममय पुरुषाचें जीवन होतें. परंतु स्वपुरुषार्थाने जेव्हा त्याने ह्या काममय जीवनाचा अन्त केला तेव्हा ते बुध्द म्हणजेच ज्ञानी बनले, नराचा नारायण झाले व आता त्यांचे जीवन दिव्य म्हणजेच ज्ञानमय झालें. ह्या अवस्थेलाच मनुष्याचा खरा पुनर्जन्म म्हणतात. आणि तिच्या प्राप्ती-करिताच मनुष्यमात्राची सारखी धडपड चालू असते. फरक एवढाच

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

की, कांहींचा ह्या दिशेने प्रयत्न तीन स्वरूपाचा असतो. तुकाराम महाराजांच्या शब्दांत बोलावयाचें तर "जीवनावेगळी मासोळी तैसा तुका तळमळी." बुद्धाची सुद्धा हीच भाषा आहे. ते म्हणतात—"ज्याप्रमाणे पाण्याबाहेर काढलेली मासोळी पाण्यांत जाण्याकरिता सारखी धडपड करिते, तद्वतच मनुष्य हा कामदेवाच्या तावडींतून सुटण्याचा प्रयत्न करितो." ही ज्ञानमय अवस्था प्राप्त झाल्यानंतर बुध्दाने जो जगाला उपदेश दिला तो पुनः तुकाराम महाराजांच्या शब्दांत बोलावयाचें तर "बुडता हे जन न देखवे डोळां" ह्या दयार्द्र भावनेनेच केला हें उघड आहे. मग ह्या उपदेशांत तत्वज्ञान कोठून येणार? मनुष्यमात्राविषयीं किंबहुना समस्त प्राणिमात्राविषयीं निस्सीम प्रेम हेंच ह्या उपदेशाचें सार. आई जशी आपल्या एकुलत्या एक मुलावर प्रेम करून त्याला प्रसन्न करण्याचा प्रयत्न करिते, त्याचप्रमाणे बुद्धाने जगाचें दुःख नष्ट करून त्याला सुखी करण्याचा प्रयत्न केला. सारनाथ येथे आषाढी पौर्णिमेला त्यानी जो सर्व प्रथम उपदेश दिला, त्यात ते म्हणतात—"हे कुलपुत्रांनो, बहुजनहितार्थ, बहुजनसुखार्थ, लोकांवर दया करण्याच्या उद्देशाने, देव आणि मनुष्य यांच्या कल्याणाकरितां, हिताकरितां, सुखाकरितां ह्या धर्माचा प्रसार करा. आरंभीं कल्याणकारक, मध्यात कल्याणकारक व शेवटीं कल्याणकारक अशा या धर्माचा तुम्ही अर्थयुक्त भावाने प्रसार करा." लोककल्याण हेंच बुध्दाचें तत्वज्ञान होतें म्हटलें तरी चालेल. वास्तविक बुध्दाने जो प्रचार केला तो स्वानुभूतीचा; कोणत्याहि मताचा, सिद्धांताचा अथवा तत्वज्ञानाचा नव्हे. एकदा वत्सगोत्र नामक परिव्राजकाने बुध्दाला प्रश्न विचारला—"हे गौतम, आपलें मत म्हणजेच तत्वज्ञान काय आहे?" ह्यावर बुध्दाने उत्तर दिलें—"स्वानुभूति हेंच माझें मत." मला त्रैविद्य म्हणणाराच यथार्थवादी आहे असें बुध्दाने स्पष्ट म्हटलें आहे. ह्यावर वत्सगोत्र परिव्राजक म्हणाला—"आपला पंथ शून्यच अथवा शून्यमतवादी आहे." त्याचप्रमाणे चूळ मालुंक्य पुत्राने जेव्हा बुद्धाला विचारलें की, लोक शाश्वत

आहेस की अशाश्वत? मरणानंतर मुक्त पुरुषाचें काय होतें वगैरे-
तेव्हा बुध्दाने स्पष्ट शब्दांत सांगितलें की—असले प्रश्न निरर्थक असल्या-
मुळे विचारार्ह नाहीत. लोक शाश्वत असले काय किंवा अशाश्वत असले
काय, असले प्रश्न चित्तशुद्धीला मुळीच मदत करीत नाहीत. तेल
संपल्यामुळे दिव्याची ज्योत विझते व ती कोठे जाते हें सांगणें जसें
कठीण; तसेंच मेल्यानंतर मुक्त पुरुषाचें काय होतें हें सांगणें कठीण;
तसेंच दुःख कोण भोगतो वगैरे प्रश्न बुद्ध निरर्थक म्हणत; तर मी दुःखी
कां ह्याचाच विचार करा असें ते म्हणत. अविद्या हीच दुःखाचें मूळ
कारण आहे असें बुद्धाचें म्हणणें आहे. अविद्येचा नाश म्हणजेच
दुःखाचा नाश व दुःखाचा नाश म्हणजेच परमसुखप्राप्ति. ह्या
अवस्थेलाच बुद्ध निर्वाण अथवा शून्य म्हणतो. अहंतेची व ममत्वाची
भावना समूळ नष्ट झाल्याशिवाय मनुष्य निर्वाणपदाला पोचूं शकत
नाही. आणि म्हणूनच बुद्धाचा जोर त्यागावर आहे. कारण त्यागानेच
ही मनुष्यरूपी नाव हलकी होते व सहजच ती पलीकडच्या तीरावर
सुखरूप पोचते. तसेंच ध्येयाप्रमाणे ध्येयप्राप्तीचा मार्ग सुद्धा शुद्ध व
पवित्रच असला पाहिजे. असत्य मार्गानें आपण सत्य गाठूंच शकत
नाही. आणि ह्याच कारणास्तव बुद्धाने अहिंसेवरच जोर दिला.

बुध्द हा सर्वोपरि पुरुषार्थवादी आहे, कर्मवादी आहे, प्रयत्नवादी
आहे. जगाचा निर्माता अथवा नियंता परमेश्वर आहे व सर्व कांही
त्याच्याच इच्छेप्रमाणे घडतें असली विचारसरणी बुद्धाला केव्हांहि मान्य
नव्हती. वास्तविक असली विचारसरणी मनुष्याला पराधीन व निष्क्रिय
बनविते. बुध्द म्हणतो—समजा, एखाद्या मनुष्याला विषारी बाण
लागला, व त्यामुळे त्याला प्राणांतिक वेदना होत आहेत. अशा
परिस्थितींत एक वैद्य त्याच्याकडे जातो व विषारी बाण काढूं लागतो,
परंतु अशा वैद्याला जर तो रोगी म्हणेल—"छे, जोपर्यंत हा विषारी
बाण कोणी मारला वगैरे गोष्टींचें मला ज्ञान होत नाही तोपर्यंत हा बाण
मी काढूं देणार नाही" परम कारुणिक बुध्द विचारतात की—असल्या
रोग्याचें काय होईल? अर्थातच विषारी बाणाच्या वेदनेंतच त्याचा अंत

[illegible]
ना। विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
है— नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

होईल. बाण काढण्याकरितां बाण मारणाराची काय आवश्यकता ? उलट बाण मारणारा बाण काढण्याकरितां मदत कशी करूं शकतो ? आणि म्हणून बाण कोणी मारला हा प्रश्न जसा निरर्थक, तद्वतच हें जग कोणी निर्माण केलें, का निर्माण केलें वगैरे प्रश्न निरर्थक आणि म्हणून त्याज्य समजावे, असें बुध्दाचें म्हणणें असे.

बुध्दाचे वेळी काही शाश्वतवादी म्हणजेच आत्मवादी लोक होते. प्रत्येक मनुष्यांत आत्मा हा शाश्वत अथवा अमर असून तो पाप-पुण्याच्या पलीकडे आहे, असें ते प्रतिपादीत. मनुष्य जेव्हा कायेने पाप करितो, तेव्हा त्याचा आत्मा त्या पापापासून अलिप्त असतो असें ते मानीत. असल्या विचारसरणीने हे आत्मवादी लोक पापाला सर्रास उत्तेजन देत. दुसरे शाश्वतवादी ह्या आत्म्याच्या मुक्ततेकरिता तपश्च-र्येच्या आगींत देहाची लाही करायला सांगत. अशा प्रकारचे हे द्विविध शाश्वतवादी लोक उच्छेदवाद्याप्रमाणेच वास्तविक देहाच्या भोवतींच घोटाळणारे आणि म्हणूनच अनात्मज्ञच होते. ह्या नास्तिक व अनार्य मताच्या खंडनार्थ बुध्दाने अनात्मवाद प्रतिपादिला व हा अनात्मवादच बौद्धांचें खरें तत्वज्ञान होय म्हटलें तरी चालेल. अभिधम्म पिटकांत ह्या अनात्मत्वाची तात्त्विक मीमांसा केलेली आहे. अनात्मवाद म्हणजे अनहंवाद. अहंता आणि ममता याचे संपूर्ण निराकरण हें निर्वाणावस्थेचें अथवा शून्यत्वाचें अन्तिम लक्षण असल्यामुळे बुद्ध हा खरोखर अनहं-वादी होता आणि म्हणूनच तो आत्मज्ञ होता हें उघड आहे. बुद्ध हा अनात्मवादी होता ह्याचा अर्थ एवढाच की, त्याने आपलें नामरूप अथवा व्यक्तिमत्व संपूर्णपणे पुसून टाकलें होतें व तो विश्वाशीं समरस झाला होता. वस्तुमात्र अनित्य आणि म्हणूनच दुःखमय हें जाणून कोणत्याहि वस्तूला 'मी' किंवा 'माझें' न म्हणणें हाच दुःखमुक्तीचा उपाय होय असें बुद्धाचें म्हणणें असे. बुद्धाच्या अनात्मवादाला 'शून्य-वाद' नाव देणेंच यथार्थ होईल, कारण शून्यत्व हेंच संपूर्णत्वाचें लक्षण मानले जाते. महान् बौद्ध तत्ववेत्ता नागार्जुन ह्याने शून्यवादाचाच पुरस्कार केलेला आहे. ज्ञानेश्वरींत ज्ञानेश्वमहाराजांनी शून्य शब्दाचा

उपयोग कितीदां तरी निर्वाण अथवा परब्रह्म ह्या अर्थानें केलेला आढळतो. शून्याविषयीं ज्ञानेश्वर महाराज म्हणतात—

> तेंहि गुणत्रय जेव्हां लोपे । तें जें शून्य (ओ. ९२५ अ. १३)
> नभाचें शून्यत्व गिळून । गुण त्रयातें नुरऊन
> तें शून्य तें महाशून्य । श्रुतिवचनसंमत (ओ. ९२६ अ. १३).
> नया मी पुराणु । शून्यु मी संपूर्णु (ओ. ११९७ अ. १८)
> पा थाउलिया एकाएकु । साहे तो शून्य विशेखु
> तैसा आहे नाहींचा सेखु । मीच मग आथी (ओ. १२१२ अ. १८).

ह्या ओवीचा अर्थ हा की, एकांतून एक काढला असतां बाकी जरी शून्य उरतें, त्याचप्रमाणें आहे व नाही यांची वजावाकी केली असतां मीच उरतों. ज्ञानेश्वर महाराज आणखी म्हणतात—

> वन्हीची ज्वाळा जैसी । थावी जाय आकाशीं
> क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजीं (ओ. ११३ अ. १९)

हा शून्यवादच बौद्धांचें तत्वज्ञान असल्यामुळे भगवान् बुद्ध हे एक महान् निष्काम कर्मयोगी होते हें स्पष्ट आहे. जगाचें बाह्यरूप जसें शून्याकार आहे त्याचप्रमाणे त्याचें अंतरंग सुध्दा शून्यच आहे, हें समजणेंच खरा अद्वैतवाद होय.

ज्या परम कारुणिक भगवान् बुद्धानें मला हें पुस्तक लिहिण्याची प्रेरणा केली त्याच्याच पदकमलीं हें धर्मपदरूपी कमळ अर्पण करतों व अशी भावना प्रगट करतों की, प्रपंच व परमार्थ यांचा समन्वय करणाऱ्या सुवर्ण मध्यमाला मार्गदर्शक भगवान् बुद्ध यांचा सदासर्वदा जयजयकार होवो.

> जयतु जयतु बुद्धः शुद्धसत्वस्वरूपो ।
> जयतु जयतु शास्ता मारजेता मुनीन्द्रः ।
> जयतु जयतु वंद्यो धर्मचक्रप्रणेता ।
> जयतु जयतु लोकोद्धारकारोशरण्यः ॥

फाल्गुन व. २, शके १८७६
गुढीपाडवा, दि. २८ मार्च १९५६ — अनंत रामचंद्र कुळकर्णी

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज ।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव ॥

॥ नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा सम्बुद्धस्स ॥

# धम्मपद

## १ यमक वर्ग

स्थान–श्रावस्ती　　　　　　　　　　　　व्यक्ति–चक्खुपाल थेर

१　मनोपुब्बङ्गमा धम्मा* मनोसेट्ठा मनोमया।
　　मनसा चे पदुट्ठेन भासति वा करोति वा।
　　ततो नं दुक्खमन्वेति चक्कं व वहतो पदं ॥१॥

मनुष्याच्या सर्व व्यवहारांचें उगमस्थान मन आहे. त्याचे सर्व व्यवहार मनःप्रधान, मनोमय आहेत. मनुष्य जर दुष्ट चित्ताने बोलेल किंवा चालेल तर चालत्या बैलगाडीचें चाक ज्या प्रमाणे बैलाच्या पायाचा पाठलाग करितें त्याचप्रमाणे दुःख अशा दुष्ट चित्ताने वागणाऱ्या मनुष्याच्या मागे लागतें.

श्रावस्ती　　　　　　　　　　　　मट्ठकुण्डली

२　मनोपुब्बङ्गमा धम्मा मनोसेट्ठा मनोमया।
　　मनसा चे पसन्नेन† भासति वा करोति वा।
　　ततो नं सुखमन्वेति छाया व अनपायिनी ॥२॥

---

* धम्मा = धर्मा. ह्या ठिकाणीं धर्म म्हणजे चित्ताची प्रवृत्ति अथवा व्यवहार.

† पसन्नेन = प्रसन्नेन. "मन करारे प्रसन्न सर्व सिद्धीचें कारण." —संत तुकाराम. "मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः"—भ. गी.

मनुष्याच्या सर्व व्यवहारांचें उगमस्थान मन आहे. त्याचें सर्व व्यवहार मनःप्रधान, मनोमय आहेत. मनुष्य जर शुद्ध चित्ताने बोलेल किंवा चालेल तर कधी न सोडणारी मनुष्याची छाया ज्याप्रमाणे त्याच्या बरोबरच असते त्याचप्रमाणे सुख त्याच्या सदोदित बरोबर राहतें.

श्रावस्ती–जेतवन शुल्लतिस्स (थेर)

३ अक्कोच्छि मं अवधि मं अजिनि मं अहासि मे।
येच तं उपनय्हन्ति वेरं तेसं न सम्मति ॥३॥

त्याने मला शिव्या दिल्या, त्याने मला मारिलें, त्याने मला जिंकिलें, त्याने मला लुटलें अशा विचारांना जे थारा देतात त्यांचें वैर कधीच शांत होत नाही.

४ अक्कोच्छि मं अवधि मं अजिनि मं अहासि मे।
ये त न उपनय्हन्ति वेरं तेसूपसम्मति ॥४॥

त्याने मला शिव्या दिल्या, त्याने मला मारिलें, त्याने मला जिंकिलें, त्याने मला लुटलें अशा विचारांना जे थारा देत नाहीत त्यांचें वैर शांत होतें.

श्रावस्ती (जेतवन) काळी (यक्षिणी)

५ न हि वेरेन वेरानि सम्मन्तीध कुदाचनं।
अवेरेन च सम्मन्ति एस धम्मो सनन्तनो ॥५॥

वैराने वैर कधीच शांत होत नाही; अवैरानेच तें शांत होतें. हाच सनातन धर्म आहे.

श्रावस्ती (जेतवन) कोसम्बक भिक्खू

६ परे च न विजानन्ति मयमेत्थ यमामसे।
ये च तत्थ विजानन्ति ततो सम्मन्ति मेधगा ॥६॥

अज्ञ लोकांना हें कळत नाही की आपणा सर्वांना येथून जावें लागणार आहे. ज्यांना हें कळतें त्यांचे सर्व कलह मिटतात.

फद कहफर दाहण [illegible]

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

श्रावस्ती | चुल्लकाल महाकाल

७ सुभानुपस्सिं विहरन्तं इंद्रियेसु असंवुतं ।
भोजनम्हि अमत्तञ्ञुं कुसीतं हीनवीरियं ।
तं वे पसहति मारो वातो रुक्खं व दुब्बलं ॥७॥

जो पुरुष रागदृष्टीने वावरतो, जो इन्द्रियांना लगाम लावीत नाही, जो भोजनीं उचित मात्रा जाणीत नाही, जो आळशी व वीर्यहीन आहे अशा पुरुषास कामदेव त्याचप्रमाणे पदच्युत करितो, ज्याप्रमाणे सोसाट्याचा वारा दुर्बल झाडाला.

८ असुभानुपस्सिं विहरन्तं इंद्रियेसु सुसंवुतं ।
भोजनम्हि च मत्तञ्ञुं सद्धं आरद्ध वीरियं ।
तं वे नप्पसहति मारो वातो सेलं व पब्बतं ॥८॥

जो पुरुष वैराग्य दृष्टीने वावरतो, जो इंद्रियांना ताब्यांत ठेवतो, जो भोजनीं उचित मात्रा जाणतो, जो श्रध्दायुक्त व उत्साहशील आहे, अशा पुरुषास, ज्याप्रमाणे सोसाट्याचा वारा पर्वताला हालवूं शकत नाही, कामदेव भ्रष्ट करूं शकत नाही.

श्रावस्ती (जेतवन) | देवदत्त

९ अनिक्कसावो कासावं यो वत्थं परिदहेस्सति
अपेतो दमसच्चेन न सो कासावमरहति ॥९॥

चित्ताचा मल नष्ट केल्याशिवाय जो काषाय वस्त्र धारण करितो, जो संयम व सत्य पाळीत नाही, असला पुरुष काषाय वस्त्राचा अधिकारी होवूं शकत नाही.

१० योच वन्तकसावस्स सीलेसु सुसमाहितो ।
उपेतो दमसच्चेन स वे कासावमरहति ॥१०॥

ज्याने आपलें चित्त शुध्द केलें आहे, जो शीलवान् आहे, जो संयम आणि सत्याने युक्त आहे, असाच पुरुष काषाय वस्त्राचा अधिकारी बनतो.

राजगृह (वेणुवन) संजय

११ असारे सारमतिनो सारे चासारदस्सिनो ।
ते सारं नाधिगच्छन्ति मिच्छासंकप्पगोचरा ॥११॥

जे असाराला सार आणि साराला असार समजतात असले मिथ्या-दृष्टि लोक सार प्राप्त करूं शकत नाहीत.

१२ सारं च सारतो ञत्वा असारं च असारतो ।
ते सारं अधिगच्छन्ति सम्मासंकप्पगोचरा ॥१२॥

जे साराला सार व असाराला असार ओळखतात असले सम्यक्-दृष्टि लोक सार प्राप्त करितात.

श्रावस्ती (जेतवन) नन्द (थेर)

१३ यथा गारं दुच्छन्नं वुट्ठी समतिविज्झति ।
एवं अभावितं चित्तं रागो समतिविज्झति ॥१३॥

वाईट छावलेल्या घरातून पावसाचें पाणी जसें आत शिरतें त्याचप्रमाणे असावध चित्तात राग शिरतो.

१४ यथागारं सुच्छन्नं वुट्ठी न समतिविज्झति ।
एवं सुभावितं चित्तं रागो न समतिविज्झति ॥१४॥

नीट छावलेल्या घरांत जसें पावसाचें पाणी आत शिरत नाही त्याचप्रमाणे सुरक्षित चित्तात राग प्रवेश करूं शकत नाही.

राजगृह (वेणुवन) चुन्द (सूकरिक).

१५ इध सोचति पेच्च सोचति
पापकारी उभयत्थ सोचति ।
सो सोचति सो विहञ्ञति
दिस्वा कम्मकिलिट्ठमत्तनो ॥१५॥

इहलोकांत शोक करितो आणि परलोकांत देखील शोक करितो; पापी दोन्ही ठिकाणीं शोक करितो. आपलीं मलीन कर्में पाहून तो शोक करितो, दुःखी होतो.

[illegible]

विरिञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज ।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव ॥

श्रावस्ती (जेतवन) धर्मिक (उपासक)

**१६ इध मोदति पेच्च मोदति**
**कतपुञ्ञो उभयत्थ मोदति।**
**सो मोदति सो पमोदति**
**दिस्वा कम्म विसुद्धिमत्तनो ॥१६॥**

इहलोकात मोद करितो आणि परलोकात देखील मोद करितो; पुण्यात्मा दोन्ही ठिकाणीं मोद करितो. तो मोद करितो; आपली शुध्द कर्में पाहून तो आनंदित होतो.

श्रावस्ती (जेतवन) देवदत्त

**१७ इध तप्पति पेच्च तप्पति**
**पापकारी उभयत्थ तप्पति।**
**पापं मे कतन्ति तप्पति,**
**भीय्यो तप्पति दुग्गतिं गतो ॥१७॥**

इहलोकांत संताप करितो आणि परलोकांत देखील संताप करितो; पापी दोन्ही लोकात संताप करितो. 'मी पाप केलें' असें जाणून तो संतापतो. दुर्गति प्राप्त झाल्यामुळे तो अधिकच संतापतो.

श्रावस्ती (जेतवन) सुमना देवी

**१८ इध नन्दति पेच्च नन्दति**
**कतपुञ्ञो उभयत्थ नन्दति।**
**पुञ्ञं मे कतन्ति नन्दति,**
**भीय्यो नन्दति सुग्गतिं गतो ॥१८॥**

इहलोकांत आनंद मानितो व पर लोकांत देखील आनंद मानितो; पुण्यात्मा दोन्ही ठिकाणीं आनंद मानितो. 'मी पुण्य केलें आहे' असें जाणून तो आनंद मानितो. तो सुगति प्राप्त झाल्यामुळे अधिकच आनंदित होतो.

श्रावस्ती (जेतवन) दोन मित्र भिक्षु

१९ बहुंपि चे संहितं भासमानो,
न तक्करो होति नरो पमत्तो।
गोपो व गावो गणयं परेसं
न भागवा सामञ्ञस्स होति ॥१९॥

एखादा प्रमत्त पुरुष जरी धर्मग्रन्थांचें पुष्कळ पठन करीत असला तरी त्याप्रमाणे जर त्याचें आचरण नसेल तर दुसऱ्याच्या गाई मोजणाऱ्या गुराख्याप्रमाणे तो श्रमणत्वाचा भागीदार होत नाही.

२० अप्पम्पि चे संहितं भासमानो,
धम्मस्स होति अनुधम्मचारी।
रागं च दोसं च पहाय मोहं,
सम्मप्पजानो सुविमुत्तचित्तो।
अनुपादियानो इध वा हुरं वा,
स भागवा सामञ्ञस्स होति ॥२०॥

उलट एखादा पुरुष जरी धर्मग्रंथांचें थोडेंच पठन करीत असला, परंतु जर तो त्याप्रमाणे धर्माचरण करितो व राग–द्वेष–मोह यांचा त्याग करून दक्षतापूर्वक वागणारा व मुक्तचित्त असेल व इहलोकांत, अथवा परलोकांत कशांतच आसक्त नसेल तर तो उचितच श्रमणत्वाचा अधिकारी आहे.

## २ अप्रमाद वर्ग

कौशाम्बी (घोषिताराम) सामावती (राणी)

२१ अप्पमादो अमत–पदं पमादो मच्चुनो पदं।
अप्पमत्ता न मीयन्ति ये पमत्ता यथा मता ॥१॥

दक्षता अमरत्व आहे. प्रमाद अथवा अविचार हा मृत्यूचें पद आहे. अप्रमत्त हे कधीच मरत नाहीत. उलट प्रमत्त हे मृतवत्च आहेत.

२२ एतं विसेसतो ञत्वा अप्पमादम्हि पण्डिता ।
अप्पमादे पमोदन्ति अरियानं गोचरे रता ॥२॥

ही जाणीव बाळगून पंडित लोक अप्रमादांत आनंद मानून आर्यांच्या आचरणांत रममाण होतात.

२३ ते झायिनो साततिका निच्चं दळ्हपरक्कमा ।
फुसन्ति धीरा निब्बाणं योगक्खेमं अनुत्तरं ॥३॥

ते सतत ध्यान करणारे, सदोदित दृढपराक्रमी धीर पुरुष सर्वोत्तम कल्याणप्रद अशा निर्वाण पदास प्राप्त करितात.

राजगृह (वेणुवन) कुम्भ घोसक.

२४ उट्ठानवतो सतीमतो
सुचि कम्मस्स निसम्मकारिणो ।
सञ्ञतस्स च धम्मजीविनो
अप्पमत्तस्स यसोभिवड्ढति ॥४॥

जो उद्योगशील आहे, जो स्मृतिमान् आहे, जो शुभ कर्म करणारा आहे, जो सुविचारपूर्वक काम करणारा आहे, जो संयमी आहे, जो धर्माप्रमाणे आचरण करणारा आहे व अप्रमत्त आहे अशा पुरुषाचें यश सारखें वाढत असतें.

राजगृह (वेणुवन) चुल्लपन्थक (थेर).

२५ उट्ठानेनप्पमादेन सञ्ञमेन दमेन च ।
दीपं कयिराथ मेधावी यं ओघो नाभिकीरति ॥५॥

धीर पुरुषाने सतत प्रयत्नाने, दक्षतेने, संयमाने व नियंत्रणाने स्वतःला असें द्वीप बनवावें की, ज्याला ओघ अथवा पूर बुडवूं शकणार नाही.

जेतवन बालनक्षत्रघुट्ठ

२६ पमादमनुयुञ्जन्ति बाला दुम्मेधिनो जना ।
अप्पमादञ्च मेधावी धनं सेट्ठं 'व रक्खति ॥६॥

मूर्ख असमंजस लोक आळसांत मग्न राहतात. बुद्धिमान् पुरुष श्रेष्ठ धनाप्रमाणे आपल्या उत्साहशीलतेचें रक्षण करितात.

२७ मा पमादमनुयुञ्जेथ मा कामरतिसन्थवं ।
अप्पमत्तो हि झायन्तो पप्पोति विपुलं सुखं ॥७॥

प्रमादांत फसूं नका. विषयभोगांत आसक्त राहूं नका. अप्रमत्त बना व ध्यानांत मग्न राहून विपुल सुख संपादन करा.

जेतवन महाकस्सप (थेर)

२८ पमादं अप्पमादेन यदा नुदति पण्डितो ।
पञ्ञापासादमारुय्ह असोको सोकिनिं पजं ।
पब्बतट्ठो 'व भूम्मट्ठे धीरो बाले अवेक्खति ॥८॥

पर्वतावर चढलेला पुरुष ज्याप्रमाणे खालील लोकांना पाहतो त्याचप्रमाणे अप्रमादाने प्रमादाला जिंकून प्रज्ञारूपी प्रासादावर चढलेला शोकरहित धीर पुरुष संसारांत पडलेल्या शोकाकुल लोकांना पाहतो.

जेतवन दोन मित्र भिक्षु

२९ अप्पमत्तो पमत्तेसु सुत्तेसु बहुजागरो ।
अबलस्सं 'व सीघस्सो हित्वा याति सुमेधसो ॥९॥

वेगवान् घोडा दुर्बल घोड्याला मागे टाकून जसा पुढे सरसावतो त्याचप्रमाणे बुद्धिमान् पुरुष प्रमत्त लोकांत अप्रमत्त व झोपी गेलेल्या मध्ये जागरणशील राहून पुढे जातो.

वैशाली (कूटागार) महाली

३० अप्पमादेन मघवा देवानं सेट्ठतं गतो ।
अप्पमादं पसंसन्ति पमादो गरहितो सदा ॥१०॥

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

अप्रमादानेच इन्द्राला देवांमध्ये श्रेष्ठ स्थान प्राप्त झालें. अप्रमादाची स्तुति करितात व प्रमादाची सदोदित निंदा होते.

जेतवन एक भिक्षु

३१ अप्पमादरतो भिक्खु पमादे भयदस्सि वा ।
सञ्ञोजनं अणुं थूलं डहं अग्गीव गच्छति ॥११॥

जो भिक्षु अप्रमादांत आनंद मानतो व प्रमादाला भितो तो अग्नीप्रमाणे लहान मोठ्या बंधनांना जाळीत पुढें जातो.

जेतवन (निगमवासी) तिस्सथेर

३२ अप्पमादरतो भिक्खु पमादे भयदस्सि वा ।
अभब्बो परिहाणाय निब्बाणस्सेव सन्तिके ॥१२॥

जो भिक्षु अप्रमादांत आनंद मानतो व प्रमादाला भितो तो निर्वाणाजवळ जातो. त्याचें पतन होणें संभवत नाही.

## ३ चित्त वर्ग

चालिय पर्वत मेघिय थेर

३३ फन्दनं चपलं चित्तं दूरक्खं दुन्निवारयं ।
उजुं करोति मेधावी उसुकारो'व तेजनं ॥११॥

मन हें ओढाळ, चंचल, दुर्निवार व दुर्धर आहे. बाणकार जसा बाणाला सरळ करितो तसा मेधावी अथवा बुध्दिमान पुरुष अशा मनाला एकाग्र व सरळ करितो.

३४ वारिजो' व थले खित्तो ओकमोकत उब्भतो* ।
परिफन्दति'दं चित्तं मारधेय्यं पहातवे ॥२॥

पाण्याबाहेर काढलेली मासोळी ज्याप्रमाणें तडफडते त्याचप्रमाणें माराच्या म्हणजे कामदेवाच्या तावडींतून सुटण्याकरितां मन व्याकुळ असतें.

* जीवनावेगळी मासोळी । तैसा तुज वेगळा'—संत तुकाराम

श्रावस्ती कोई

३५ दुन्निग्गहस्स लहुनो यत्थ कामनिपातिनो ।
चित्तस्स दमथो साधु चित्तं दन्तं सुखावहं ॥३॥

ज्याचा निग्रह करणें फार कठीण आहे, जें फार चपळ आहे, जेथे वाटेल तेथे झटकन जातें अशा चित्ताचें दमन करणें फार उत्तम आहे कारण दमन केलेलें चित्त फार सुखदायक असतें

श्रावस्ती कोणी उत्कंठित भिक्षु

३६ सुदुद्दसं सुनिपुणं यत्थकामनिपातिनं ।
चित्तं रक्खेथ मेधावी, चित्तं गुत्तं सुखावहं ॥४॥

ज्यास समजणें सोपें नाही, जें अत्यन्त चलाख आहे व जें वाटेल तेथे झटकन जातें अशा चित्ताचें बुद्धिमान पुरुषाने रक्षण करावें. कारण सुरक्षित चित्त सुखदायक असतें.

श्रावस्ती संघरक्खित (थेर)

३७ दूरंगमं एकचरं असरीरं गुहासयं ।
ये चित्तं सञ्ञमेस्सन्ति मोक्खन्ति मारबन्धना ॥५॥

दूर जाणारें, एकटेंच वावरणारें, अशरीर व गूढ अशा चित्ताचें जे संयम करितात ते माराच्या बंधनांतून मुक्त होतात.

श्रावस्ती चित्तहत्थ (थेर)

३८ अनवट्ठित चित्तस्स सद्धम्मं अविजानतो ।
परिप्लवपसादस्स पञ्ञा न परिपूरति ॥६॥

जो आपल्या चित्ताला त्वरेने आणत नाही, जो सद्धर्म जाणत नाही, ज्याची श्रध्दा चंचल आहे, अशा पुरुषाची प्रज्ञा परिपूर्ण होत नाही.

३९ अनवस्सुत चित्तस्स अनन्वाहतचेतसो ।
पुञ्ञपापपहीणस्स नत्थि जागरतो भयं ॥७॥

---

यिरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज ।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव ॥

ज्याचें चित्त अनासक्त, द्वेषरहित व पापपुण्याच्या पलीकडे गेलें आहे अशा दक्ष पुरुषाला कशाचेंच भय नाहीं.

श्रावस्ती पांचशें भिक्षु

४० कुम्भूपमं कायमिमं विदित्वा
नगरुपमं चित्तमिदं ठपेत्वा ।
योधेथ मारं पञ्ञायुधेन
जितं च रक्खे अनिवेसिनो सिया ॥८॥

ह्या शरीराला मडक्याप्रमाणें क्षणभंगुर जाणून मनाला नगराप्रमाणें सुरक्षित आणि दृढ समजून प्रज्ञारूपी शस्त्रानें कामदेवाशीं युद्ध करावें व जिंकलेल्याचें अनासक्त वृत्तीनें रक्षण करावें.

श्रावस्ती पूतिगत्त तिस्स (थेर)

४१ अचिरं वत'यं कायो पठविं अधिसेस्सति ।
छुद्धो अपेतविञ्ञाणो निरत्थं'व कलिङ्गरं ॥९॥

हाय ! अरे हें तुच्छ शरीर लौकरच अचेतन होऊन लाकडाच्या ओंडक्याप्रमाणें जमिनीवर निरर्थक पडलें राहील.

कोसल देश नन्द (गोप)

४२ दिसो दिसं यन्तं कयिरा वेरी वा पन वेरिनं ।
मिच्छापणिहितं चित्तं पापियो नं ततो करे ॥१०॥

जेवढें नुकसान शत्रु शत्रूचें आणि वैरी वैऱ्याचें करितो त्यापेक्षां अधिक नुकसान वाईट मार्गावर लागलेलें मन करितें.

कोसल देश सोरेय्य (थेर)

४३ न तं माता पिता कयिरा अञ्ञे वापि च ञातका
सम्मापणिहितं चित्तं सेय्यसो नं ततो करे ॥११॥

मनोहर व वर्णयुक्त पण गन्धहीन फुलाप्रमाणे आचारहीन पुरुषाचें सुभाषित व्यर्थ असतें.

> ५२ यथापि रुचिरं पुप्फं वण्णवन्तं सगन्धकं ।
> एवं सुभासिता वाचा सफला होति कुब्बतो ॥९॥

मनोहर व वर्णयुक्त पण सुगन्धित फुलाप्रमाणे आचारयुक्त पुरुषाचें सुभाषित यथार्थ असतें.

श्रावस्ती पूर्वाराम — विशाखा (उपासिका).

> ५३ यथापि पुप्फरासिम्हा कयिरा मालागुणे बहू ।
> एवं जातेन मच्चेन कत्तब्बं कुसलं बहुं ॥१०॥

ज्याप्रमाणे पुष्प-राशीच्या पुष्कळ पुष्पमाला बनतात, त्याचप्रमाणे जन्मास आलेल्या मर्त्याने पुष्कळ पुण्य संपादन करावें.

श्रावस्ती — आनंद (थेर).

> ५४ न पुप्फगन्धो पटिवातमेति ।
> न चन्दनं तगर मल्लिका वा ।
> सतं च गन्धो पटिवातमेति ।
> सब्बा दिसा सप्पुरिसो पवाति ॥११॥

पुष्पाचा सुगंध-गंध तें पुष्प चन्दनाचें असो, तगराचें असो वा चमेलीचें असो—वाऱ्याच्या उलट दिशेला जाऊं शकत नाही. परंतु सन्तांचा सुगन्ध वाऱ्याच्या उलट दिशेने सुद्धा जातो, सत्पुरुषांचा सुगन्ध सर्व दिशांना व्यापून टाकतो.

> ५५ चन्दनं तगरं वापि उप्पलं अथ वस्सिकी ।
> एतेसं गन्ध जातानं सील गन्धो अनुत्तरो ॥१२॥

चंदन, तगर, कमल किंवा जुई या पुष्पांच्या सुगंधापेक्षा चारित्र्याचा सुगंध श्रेष्ठ असतो.

---

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज ।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव ॥

राजगृह (वेणुवन) महाकस्सप

५६ अप्पमत्तो अयं गन्धो यायं तगरचन्दनी ।
यो च सीलवतं गन्धो वाति देवेसु उत्तमो ॥१३॥

चंदन किंवा तगर यांचा सुगंध अल्पमात्र असतो. परंतु शीलवान पुरुषांचा उत्तम सुगंध देवापर्यंत जातो.

राजगृह (वेणुवन) गोधिक (थेर)

५७ तेसं संपन्नसीलानं अप्पमादविहारिनं ।
सम्मदञ्ञाविमुत्तानं मारो मग्गं न विन्दति ॥१४॥

असे जे शीलसंपन्न, दक्षतापूर्वक वागणारे, सम्यक् ज्ञानी मुक्त (अर्हत) अशांचा मार्ग कामदेव जाणत नाही.

श्रावस्ती (जेतवन) गरहादिन्न

५८ यथा संकारधानस्मि उज्झितस्मि महापथे ।
पदुमं तत्थ जायेथ सुचिगन्धं मनोरमं ॥१५॥

५९ एवं संकारभूतेसु अन्धभूते पुथुज्जने ।
अतिरोचति पञ्ञाय सम्मासम्बुद्धसावको ॥१६॥

मोठ्या सडकेच्या जवळ फेकलेल्या केराच्या ढिगाऱ्यातून जसें पवित्र मनोहर व सुगन्धित कमळाचें फूल निघावें त्याप्रमाणे संसारासक्त अन्ध सामान्य लोकांत सम्यक् संबुद्धाचा शिष्य आपल्या प्रज्ञेनें प्रकाशमान होतो.

---

## ५ बालवर्ग

श्रावस्ती (जेतवन) दरिद्र सेवक

६० दीघा जागरतो रत्ति दीघं सन्तस्स योजनं ।
दीघो बालानं संसारो सद्धम्मं अविजानतं ॥१॥

जागणाराला रात्र मोठी वाटते. थकलेल्याला एक योजन लांब वाटतो. सद्धर्म न जाणणाऱ्या मूर्खांना संसार दीर्घ वाटतो.

राजगृह — सार्धविहारी (शिष्य) :

६१ चरञ्चे नाधिगच्छेय्य सेय्यं सदिसमत्तनो ।
एकचरियं दळ्हं कयिरा नत्थि बाले सहायता ॥२॥

प्रवासात असतांना जर आपल्यापेक्षा श्रेष्ठ अथवा आपल्या समान पुरुष न आढळला तर मनुष्याने दृढतापूर्वक एकटेंच वावरावें. मूर्खांची संगति चांगली नसते.

श्रावस्ती — आनंद (शेठ)

६२ 'पुत्ता म'त्थि धनम्मत्थि' इति बालो विहञ्ञति ।
अत्ता हि अत्तनो नत्थि कुतो पुत्ता कुतो धनं ॥३॥

'माझा मुलगा, माझें धन' असें म्हणून मूर्ख दुःखी होतो. आपणच जर आपले नाही तर कोठला पुत्र व कोठलें धन ?

जेतवन — गिरहकट चोर

६३ यो बालो मञ्ञति बाल्यं पण्डितो वापि तेन सो ।
बालो च पण्डितमानी, स वे बालो'ति वुच्चति ॥४॥

जो मूर्ख आपला मूर्खपणा ओळखतो तो त्यामुळे पण्डित अथवा शहाणा आहे. पण जो मूर्ख आपल्याला पण्डित समजतो तो खरोखरच मूर्ख आहे.

श्रावस्ती (जेतवन) — उदायी (थेर)

६४ यावजीवम्पि चे बालो पण्डितं पयिरुपासति ।
न सो धम्मं विजानाति दब्बी सूपरसं यथा ॥५॥

मूर्ख जरि जन्मभर पण्डितांच्या सेवेत राहिला तरि त्याला धर्म कळत नाही; ज्याप्रमाणे पळीला भाजीची गोडी.

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
मुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

श्रावस्ती (जेतवन) भद्रवर्गीय (भिक्षुलोग)

६५ मुहुत्तमपि चे विञ्ञू पण्डितं पयिरुपासति ।
खिप्पं धम्मं विजानाति जिव्हा सूपरसं यथा ॥६॥

जाणता पुरुष जरी एक क्षण देखील पण्डिताच्या सेवेंत राहिला तरी त्याला तात्काळच धर्म समजतो; जसा जिभेला भाजीचा आस्वाद.

राजगृह (वेणुवन) सुप्रबुद्ध (कोढी)

६६ चरन्ति बाला दुम्मेधा अमित्तेनेव अत्तना ।
करोन्ता पापकं कम्मं यं होति कटुकप्फलं ॥७॥

दुर्बुद्धि मूर्ख स्वतःच आपला शत्रु बनून कुकर्म करीत—ज्याचें फळ कडू असतें—वावरतो.

जेतवन कोणी कास्यप

६७ न तं कम्मं कतं साधु यं कत्वा अनुतप्पति ।
यस्स अस्सुमुखो रोदं विपाकं पटिसेवति ॥८॥

जें केल्याने मनुष्याला पश्चात्ताप होतो व ज्याचा शेवट अश्रु दाळून रडण्यांत होतो तें कर्म चांगलें नव्हे.

वेणुवन सुमन (माळी)

६८ तं च कम्मं कतं साधु यं कत्वा नानुतप्पति ।
यस्स पतीतो सुमनो विपाकं पटिसेवति ॥९॥

जें केल्याने मनुष्याला पश्चात्ताप होत नाही व ज्याचा शेवट मनाच्या प्रसन्नतेंत होतो तें कर्म चांगलें.

जेतवन उप्पलवर्णा (थेरी)

६९ मधूव मञ्ञति बालो याव पापं न पच्चति ।
यदा च पच्चती पापं अथ बालो दुक्खं निगच्छति ॥१०॥

जोपर्यंत पापाचा विपाक होत नाही तोपर्यंत मूर्खाला तें गोड लागतें, परंतु जेव्हा पापाचीं फळें दिसूं लागतात तेव्हा मूर्ख दुःखी होतो.

राजगृह (वेणुवन) अम्बुक (आजीवक

७० मासे मासे कुसग्गेन बालो भुञ्जेथ भोजनं।
न सो संखतधम्मानं कलं अग्घति सोळसिं॥११॥

मूर्खाने जरी महिना महिना कुशाग्राने भोजन केलें तरी तो धर्माचा साक्षात्कार करणाऱ्यांच्या सोळाव्या अंशास देखील पात्र होऊं शकत नाही.

राजगृह (वेणुवन) अहिप्रेत

७१ न हि पापं कतं कम्मं सज्जु खीरं 'व मुच्चति।
डहन्तं बालमन्वेति भस्मच्छन्नो 'व पावको॥१२॥

ज्याप्रमाणे ताजें दूध तात्काळ विरजत नाही त्याचप्रमाणे केलेलें पाप तात्काळ फळाला येत नाही. राखेने झाकलेल्या अग्नीप्रमाणे तें (पाप) धुमसत राहतें व मूर्खांचा पाठलाग करितें.

राजगृह (वेणुवन) सट्ठिकूट (पेत)

७२ यावदेव अनत्थाय ञत्तं बालस्स जायति।
हन्ति बालस्स सुक्कंसं मुद्धमस्स विपातयं॥१३॥

मूर्खाचें सारें पांडित्य त्याच्या अनर्थालाच कारणीभूत होतें. तें त्याच्या चांगुलपणाचा नाश करितें आणि त्याच्या मस्तकाला खाली पाडतें.

जेतवन सुधम्म (थेर)

७३ असतं भावनमिच्छेय्य पुरेक्खारं च भिक्खुसु।
आवासेसु च इस्सरियं पूजा परकुलेसु च॥१४॥

७४ ममेव कतमञ्ञन्तु गिही पब्बजिता उभो।
ममेवातिवसा अस्सु किच्चाकिच्चेसु किस्मिचि।
इति बालस्स संकप्पो इच्छा मानो च वड्ढति॥१५॥

मला भिक्षु लोकांत अग्रस्थान मिळावें, मी मठाधिपति व्हावें, मी गृहस्थाकडून पूजित व्हावें, गृहस्थ त्याचप्रमाणे प्रव्रजित दोघांनीही

---

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

मार्गाने घेतलेलें मान्य करावें, सर्व कार्याकार्यांमध्ये माझ्यावरच विसंबून रहावें असल्या खोट्या संकल्पाने मूर्ख आपली तृष्णा व अहंकार वाढवितो.

श्रावस्ती (जेतवन) (वनवासी) तिस्स थेर

७५ अञ्ञा हि लाभूपनिसा अञ्ञा निब्बान-गामिनी ।
एवमेतं अभिञ्ञाय भिक्खु बुद्धस्स सावको ।
सक्कारं नाभिनन्देय्य विवेकमनुब्रूहये ॥१६॥

सांसारिक सुखाचा एक मार्ग, पण त्याहून भिन्न मार्ग निर्वाण-प्राप्तीचा आहे. आणि म्हणून बुद्धाच्या भिक्षु शिष्याने मानाची आकांक्षा धरूं नये. उलट त्याने आपल्यांत विवेक वाढवावा.

---

## ६ पंडित वर्ग

जेतवन राध (थेर)

७६ निधीनं व पवत्तारं यं पस्से वज्ज-दस्सिनं ।
निग्गय्हवादिं मेधाविं तादिसं पंडितं भजे ।
तादिसं भजमानस्स सेय्यो होति न पापियो ॥१॥

शहाण्या पुरुषाची सेवा केव्हाहि लाभदायक असते. कारण असला बुद्धिमान् पुरुष लपलेल्या खजिना दाखविणाऱ्या माणसाप्रमाणे लोकांचे दोष दाखवितो. तो अधिकारी वाणीने लोकांचे दोष उघडकीस आणतो. अशा पंडिताची सेवा केव्हाहि कल्याणकारकच असते, अनिष्ट नसते.

जेतवन अस्सजी, पुनब्बसू

७७ ओवदेय्यानुसासेय्य असब्भा च निवारये ।
सतं हि सो पियो होति असतं होति अप्पियो ॥२॥

जो उपदेश देतो, सन्मार्ग दाखवितो व कुमार्गापासून परावृत्त करितो असला पुरुष सज्जनांना प्रिय होतो व दुर्जनांना अप्रिय होतो.

जेतवन छन्न (थेर)

> ७८ न भजे पापके मित्ते न भजे पुरिसाधमे ।
> भजेथ मित्ते कल्याणे भजेथ पुरिसुत्तमे ॥३॥

वाईट मित्रांची संगति करूं नये. अधम पुरुषांचा सहवास करूं नये. सन्मित्रांची संगति करावी. उत्तम पुरुषांचा सहवास करावा.

जेतवन महाकप्पिन (थेर)

> ७९ धम्मपीती सुखं सेति विप्पसन्नेन चेतसा ।
> अरियप्पवेदिते धम्मे सदा रमति पंडितो ॥४॥

धर्मात आनंद मानणारा पुरुष प्रसन्न-चित्त सुखाने झोपतो. आर्योपदिष्ट धर्मांत शहाणे लोक सदा रममाण असतात.

जेतवन पण्डित सामणेर

> ८० उदकं हि नयन्ति नेत्तिका
> उसुकारा नमयन्ति तेजनं ।
> दारुं नमयन्ति तच्छका
> अत्तानं दमयन्ति पण्डिता ॥५॥

पाटकार माळी कालव्यांतून आपल्या इच्छेप्रमाणे पाण्याला वळण देतो; बाणकार बाणाला नीट वळवितो; सुतार लाकडाला वळण देतो, आणि पंडित अथवा शहाणे लोक आपलें स्वतःचें नियंत्रण करितात.

जेतवन भद्दिय (थेर)

> ८१ सेलो यथा एकघनो वातेन न समीरति ।
> एवं निन्दापसंसासु न समिञ्जन्ति पण्डिता ॥६॥

महान् दगडी पर्वत ज्याप्रमाणे वाऱ्याने डगमगत नाही, त्याप्रमाणे शहाणे लोक निन्दा-स्तुतीने विचलित होत नाहीत.

---

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज ।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव ॥

जेतवन काण–माता

८२ यथापि रहदो गम्भीरो विप्पसन्नो अनाविलो ।
एवं धम्मानि सुत्वान विप्पसीदन्ति पण्डिता ॥७॥

पंडित जन जेव्हा धर्म श्रवण करितात, तेव्हा ते एखाद्या गंभीर, स्वच्छ आणि निर्मळ जलाशयाप्रमाणे प्रसन्न होतात.

जेतवन पांचशे भिक्षु

८३ सब्बत्थ वे सप्पुरिसा वजन्ति ।
न कामकामा लपयन्ति सन्तो ।
सुखेन फुट्ठा अथवा दुखेन ।
न उच्चावचं पण्डिता दस्सयन्ति ॥८॥

सत्पुरुष सर्वत्र ठिकाणीं जातात, पण ते कुरकुर करीत नाहीत; कारण त्यांनी कामवासनांचा त्याग केलेला असतो. सुख प्राप्त होवो अथवा दुःख, पंडित लोक विकारवश होत नाहीत.

८४ न अत्तहेतु न परस्स हेतु
न पुत्तमिच्छे न धनं न रट्ठं
न इच्छेय्य अधम्मेन समिद्धिमत्तनो
स सीलवा पञ्ञवा धम्मिको सिया ॥९॥

स्वतःकरिता किंवा दुसऱ्याकरिता पुत्राची, धनाची किंवा राज्याची लालसा बाळगूं नये. अधर्मानें आपली उन्नति करूं नये. येणें-प्रमाणें वागणाराच शीलवान्, प्रज्ञावान् आणि धार्मिक म्हटला जातो.

जेतवन धर्मश्रवण

८५ अप्पका ते मनुस्सेसु ये जना पारगामिनो ।
अथायं इतरा पजा तीरमेवानुधावति ॥१०॥

मनुष्यांत फार थोडे लोक असे असतात की जे पलीकडचें तीर गाठतात. बाकीचे लोक तर नुसती तीरावरच धावपळ करितात.

८६ ये च खो सम्मदक्खाते धम्मे धम्मानुवत्तिनो ।
ते जना पारमेस्सन्ति मच्चुधेय्यं सुदुत्तरं ॥११॥

जे चांगल्या रीतीने सांगितलेल्या धर्माप्रमाणे आचरण करितात ते लोक मृत्यूचें दुस्तर असें साम्राज्य ओलांडून पलीकडे जातात.

जेतवन पांचशें नवीन भिक्षु

८७ कण्हं धम्मं विप्पहाय सुक्कं भावेथ पण्डितो ।
ओका अनोकं आगम्म विवेके यत्थ दूरमं ॥१२॥

८८ तत्राभिरतिमिच्छेय्य हित्वा कामे अकिञ्चनो ।
परियोदपेय्य अत्तानं चित्तक्लेसेहि पण्डितो ॥१३॥

वाईट भावनांचा त्याग करून पंडिताने चांगली भावना वाढवावी. साधारण लोकांस अगम्य असा एकान्तवास साधण्याकरिता त्याने अगृही बनावें व कामवासनांचा त्याग करावा आणि अकिंचन बनून व आपल्या चित्ताचा मळ धुवून टाकून निर्मळ बनावें.

८९ येसं सम्बोधि-अङ्गेसु* सम्मा चित्तं सुभावितं ।

---

* सम्बोधि-अंग—सम्बोधि म्हणजे सम्यक् ज्ञान. सम्बोधि-अंगें ७ आहेत—

(१) स्मृति अथवा सतत जागरूकता अथवा दक्षता.
(२) धर्म विचय अथवा सत्य जिज्ञासा.
(३) वीर्य म्हणजे धर्माभ्यासात अखंड उत्साह.
(४) प्रीति म्हणजे एकाग्रताजन्य चित्ताचा उल्हास.
(५) प्रश्रब्धि म्हणजे चित्ताची परम शांति.
(६) समाधि म्हणजे चित्ताची अकंप्य एकाग्रता.
(७) उपेक्षा म्हणजे चित्ताची सुखदुःखरहित अवस्था.

ह्या सात अंगांना प्राप्त करूनच मनुष्य सम्यक् ज्ञानी बनतो आणि म्हणून ह्यांना सम्बोधि-अंग म्हणतात.

आदान–पटिनिस्सग्गे अनुपादाय ये रता ।
खीणासवा जुतीमन्तो ते लोके परिनिब्बुता ॥१४॥

ज्यांचें चित्त सम्बोधि–अंगांत अथवा सम्यक् ज्ञानांत चांगल्या रीतीने सुदृढ झालें आहे; जे अनासक्त असून त्यात आनंद मानतात; जे अपरिग्रहांत रमलेले आहेत; (ज्यांचे) सर्व मळ नष्ट झाल्यामुळे जे प्रकाशमान आहेत त्यांनी ह्या संसारांत निर्वाण प्राप्त केलें आहे.

---

## ७ अरहन्त वर्ग

जगृह (जीवकाचें आम्रवन) जीवक.

९० गतद्धिनो विसोकस्स विप्पमुत्तस्स सब्बधि ।
सब्बगन्थप्पहीणस्स परिलाहो न विज्जति ॥१॥

ज्याने आपला मार्ग संपविला आहे, जो शोकरहित आहे, जो र्वथा विमुक्त आहे व ज्याचीं सर्व बंधनें नष्ट झालीं आहेत अशा रुषाला संताप नसतो.

राजगृह (वेणुवन) महाकस्सप

९१ उय्युञ्जन्ति सतीमन्तो न निकेते रमन्ति ते ।
हंसा ’व पल्ललं हित्वा ओकमोकं जहन्ति ते ॥२॥

स्मृतिमान् लोक सतत झटत असतात. घरांत ते तल्लीन नसतात. ज्याप्रमाणे हंस क्षुद्र जलाशयाचा त्याग करून उडून जातात, त्याप्रमाणे ते घरदार सोडून जातात.

जेतवन बेलट्ठि सीस

९२ येसं सन्निचयो नत्थि ये परिञ्ञातभोजना ।
सुञ्ञतो अनिमित्तो च विमोक्खो यस्स गोचरो ।
आकासे ’व सकुन्तानं गति तेसं दुरन्नया ॥३॥

जे अपरिग्रही असतात, जे मुक्ताहारी असतात व शून्यरूप आणि अनिमित्त अशा निर्वाण पदाला पोचलेले असतात अशा पुरुषांची गति आकाशातील पक्ष्यांच्या गतीप्रमाणे अज्ञेय असते.

राजगृह (वेणुवन) — अनुरुद्ध (थेर)

९३ यस्सा 'सवा परिक्खीणा आहारे च अनिस्सितो ।
सुञ्ञतो अनिमित्तो च विमोक्खो यस्स गोचरो ।
आकासे 'व सकुन्तानं पदं तस्स दुरन्नयं ॥४॥

जे निष्पाप आहेत, जे आहारांत अनासक्त आहेत, जे शून्यरूप व अनिमित्त अशा निर्वाणपदाला पोचलेले आहेत अशा पुरुषांची गति आकाशांत उडणाऱ्या पक्ष्यांच्या गतीप्रमाणे अगम्य असते.

श्रावस्ती (पूर्वाराम) — महाकच्चायन

९४ यस्सिन्द्रियानि समथं गतानि ।
अस्सा यथा सारथिना सुदन्ता ।
पहीनमानस्स अनासवस्स ।
देवापि तस्स पिहयन्ति तादिनो ॥५॥

उत्तम सारथ्याच्या घोड्याप्रमाणे ज्यांची सर्व इन्द्रियें शांत झाली आहेत, जो निरभिमान व निष्पाप आहे, अशा (अर्हन्ता)ची देव देखील स्पृहा करितात.

जेतवन — सारिपुत्र (थेर)

९५ पठवीसमो नो विरुज्झति ।
इन्दखीलूपमो तादि सुब्बतो ।
रहदो 'व अपेतकद्दमो ।
संसारा न भवन्ति तादिनो ॥६॥

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

तो पृथ्वीप्रमाणे अकंप्य आहे, इन्द्रकीलप्रमाणे* व्रतस्थ आहे, चिखलरहित जलाशयाप्रमाणे निर्मळ आहे, अशा पुरुषाचीं सर्व बंधनें नष्ट झाल्यामुळे तो जन्म-मरणाच्या फेऱ्यांतून मुक्त आहे.

जेतवन — कोसम्बिभासित तिस्स (थेर)

९६ सन्तं तस्स मनं होति सन्ता वाचा च कम्म च ।
सम्मदञ्ञा विमुत्तस्स उपसन्तस्स तादिनो ॥७॥

त्याचें मन शांत असतें, त्याची वाणी शांत असते, त्याचें कर्म शांत असतें. यथार्थ ज्ञान-द्वारा मुक्त झालेला शांत पुरुष असा असतो.

जेतवन — सारिपुत्र (थेर)

९७ अस्सद्धो अकतञ्ञू† च सन्धिच्छेदो च यो नरो ।
हतावकासो वन्तासो स वे उत्तम पोरिसो ॥८॥

(संपूर्ण ज्ञानी असल्यामुळे) जो श्रद्धारहित आहे (म्हणजे ज्याला श्रद्धेची आवश्यकता नाही), जो ज्ञानी आहे, सर्व बंधनें तुटल्यामुळे ज्या पुरुषाला पुनर्जन्म उरला नाही, जो अवकाशरहित आहे, ज्याने आपली तृष्णा नष्ट केली आहे, असा पुरुष उत्तम आहे.

जेतवन — (खदिरवनी) रेवत (थेर)

९८ गामे वा यदि वा रञ्ञे निन्ने वा यदि वा थले ।
यत्थारहन्तो विहरन्ति तं भूमि रामणेय्यक ॥९॥

गावांत किंवा अरण्यांत, सखल अथवा उंच जागेंत ज्या कोणत्याहि ठिकाणीं अर्हन्त वावरतात तीच भूमि रमणीय होय.

---

* इन्द्रकील = पूर्वी नगरद्वारासमोर एक मोठा व मजबूत दगडी स्तंभ उभारीत, ज्यामुळे हत्ती एकदम आक्रमण करूं शकत नसे. अशा स्तंभाला इन्द्रकील म्हणत.

† अकृत म्हणजे जें पंचमहाभूताचें बनलेलें नाही तें म्हणजे मन. त्या मनाला जो ओळखतो तो अकृतज्ञ अथवा ज्ञानी.

जेतवन — आरण्यक भिक्षु

९९ रमणीयानि अरञ्ञानि यत्थ न रमते जनो ।
वीतरागा रमिस्सन्ति न ते कामगवेसिनो ॥१०॥

जी साधारण जनाला आकर्षित करीत नाहीत तीं अरण्यें रमणीय असतात (कारण) तेथे निष्काम व वीतराग लोक—जे कामोपभोगाच्या मागे लागलेले नसतात—रमतात.

---

## ८ सहस्र वर्ग

वेणुवन — तम्बदाठिक (चोरघातक)

१०० सहस्समपि चे वाचा अनत्थपदसंहिता ।
एकं अत्थपदं सेय्यो यं सुत्वा उपसम्मति ॥१॥

निरर्थक पदांनी युक्त अशा हजारो वचनांपेक्षा एक सार्थ वचन केव्हाहि श्रेष्ठ असतें, जें ऐकून मन शांत होतें.

जेतवन — दारुचीरिय (थेर)

१०१ सहस्समपि चे गाथा अनत्थपदसंहिता ।
एकं गाथापदं सेय्यो यं सुत्वा उपसम्मति ॥२॥

निरर्थक पदांनी युक्त अशा हजारो गाथांपेक्षा एकच (अर्थयुक्त) गाथा श्रेष्ठ असते जी ऐकून मन शांत होतें.

जेतवन — कुण्डलकेशी (थेर)

१०२ यो च गाथासतं भासे अनत्थपदसंहिता ।
एकं धम्मपदं सेय्यो यं सुत्वा उपसम्मति ॥३॥

निरर्थक पदांनी युक्त अशा शंभर गाथा म्हणण्यापेक्षा एकच धर्मपद म्हणणें केव्हाहि श्रेयस्कर असतें.

---

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज ।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव ॥

१०३ यो सहस्सं सहस्सेन संगामे मानुसे जिने ।
एकं च जेय्यमत्तानं स वे संगामजुत्तमो ॥४॥

जो संग्रामांत हजारो मनुष्यांना जिंकितो, त्यापेक्षा श्रेष्ठ संग्रामविजयी तोच जो आपल्या स्वतःला जिंकितो.

जेतवन — अनर्थ-पृच्छक ब्राह्मण

१०४ अत्ता हवे जितं सेय्यो या चायं इतरा पजा ।
अत्तदन्तस्स पोसस्स निच्चं सञ्ञतचारिनो ॥५॥

१०५ नेव देवो न गन्धब्बो न मारो सह ब्रह्मुना ।
जितं अपजितं कयिरा तथारूपस्स जन्तुनो ॥६॥

या इतर प्रजेला जिंकण्यापेक्षा आपल्या स्वतःला जिंकणे श्रेष्ठ आहे. स्वतःला दमन करणारे, स्वतःला नित्य लगाम लावणारे जे पुरुष आहेत त्यांच्या विजयाला देवता, गन्धर्व, ब्रह्मा अथवा कामदेव यांपैकी कोणीच पराजित करूं शकत नाहीत.

वेणुवन — सारिपुत्राचा मामा

१०६ मासे मासे सहस्सेन यो यजेथ सतं समं ।
एकञ्च भावितत्तानं मुहुत्तमपि पूजये ।
सा येव पूजना सेय्यो यं चे वस्ससतं हुतं ॥७॥

महिना महिना शंभर वर्षेपर्यंत यज्ञ करण्यापेक्षा क्षणभर सुद्धा शुद्धात्म्याची पूजा केव्हाहि श्रेष्ठ असते.

वेणुवन — सारिपुत्राचा पुतण्या

१०७ यो च वस्ससतं जन्तु अग्गिं परिचरे वने ।
एकं च भावितत्तानं मुहुत्तपि पूजये
सा एव पूजना सेय्यो यं चे वस्ससतं हुतं ॥८॥

शंभर वर्षेपर्यंत अग्निहोत्र करण्यापेक्षा क्षणभर देखील शुद्धात्म्याची पूजा श्रेष्ठ असते.

वेणुवन — सारिपुत्राचा ब्राम्हण मित्र

१०८ यं किंचि यिट्ठं च हुतं च लोके,
संवच्छरं यजेथ पुञ्ञपेक्खो ।
सब्बम्पि तं न चतुभागमेति,
अभिवादना उज्जुगतेसु सेय्यो ॥९॥

पुण्य संपादन करण्याच्या हेतूने मनुष्याने जरी वर्षभर यज्ञ आणि हवन केलें तरी तें पुण्य शुद्धात्म्यास केलेल्या नमस्काराने प्राप्त होणाऱ्या पुण्याची एक चतुर्थांश सुद्धा बरोबरी करूं शकत नाही.

अरण्यकुटि — दीर्घायु कुमार

१०९ अभिवादनसीलिस्स निच्चं वुड्ढापचायिनो ।
चत्तारो धम्मा वड्ढन्ति आयु वण्णो सुखं बलं ॥१०॥

जो अभिवादन शील आहे व जो नेहमी वृद्धांची सेवा करितो त्याच्या चार गोष्टी वाढतात--आयु, वर्ण, सुख आणि बल.

जेतवन — संकिच्च (सामणेर)

११० यो च वस्ससतं जीवे दुस्सीलो असमाहितो ।
एकाहं जीवितं सेय्यो सीलवन्तस्स झायिनो ॥११॥

दुराचारी व संयमहीन शंभर वर्षे जगण्यापेक्षा शीलसंपन्न एकाग्रचित्त एक दिवस जगणें बरें.

जेतवन — कोण्डञ्ञ (थेर)

१११ यो च वस्ससतं जीवे दुप्पञ्ञो असमाहितो ।
एकाहं जीवितं सेय्यो पञ्ञावन्तस्स झायिनो ॥१२॥

दुष्प्रज्ञ आणि संयमहीन शंभर वर्षे जगण्यापेक्षा प्रज्ञायुक्त आणि एकाग्रचित्त एक वर्ष जगणें बरें.

---

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

जेतवन सप्पदास (थेर)

११२ यो च वस्ससतं जीवे कुसीतो हीनवीरियो ।
एकाहं जीवितं सेय्यो विरियमारभतो दल्हं ॥१३॥

आळशी व निरुद्योगी शंभर वर्षे जगण्यापेक्षा एक दिवस वीर्यवन्त जगणें बरें.

जेतवन पटाचारा (थेरी)

११३ यो च वस्ससतं जीवे अपस्सं उदयव्ययं ।
एकाहं जीवितं सेय्यो पस्सतो उदयव्ययं ॥१४॥

उत्पत्ति आणि विनाश यांचा विचार न करितां शंभर वर्षे जगण्यापेक्षा उत्पत्ति आणि विनाश ह्यांत मननशील राहून एक दिवस जगणें श्रेष्ठ आहे.

जेतवन किसा गोतमी

११४ यो च वस्ससतं जीवे अपस्सं अमतं पदं ।
एकाहं जीवितं सेय्यो पस्सतो अमतं पदं ॥१५॥

अमृतपदाची अथवा अमरत्वाची (निर्वाणाची) प्राप्ति न करितां शंभर वर्षे जगण्यापेक्षा अमरपदयुक्त एक दिवस जगणें बरें.

जेतवन बहुपुत्तिका (थेरी)

११५ यो च वस्ससतं जीवे अपस्सं धम्ममुत्तमं ।
एकाहं जीवितं सेय्यो पस्सतो धम्ममुत्तमं ॥१६॥

उत्तम धर्म न जाणता शंभर वर्षे जगण्यापेक्षा उत्तम धर्मयुक्त एक दिवस जगणें बरें.



शंभर वर्षेपर्यंत अग्निहोत्र करण्यापेक्षा क्षणभर देखील शुद्धात्म्याची पूजा श्रेष्ठ असते.

वेणुवन सारिपुत्ताचा ब्राह्मण मित्र

१०८ यं किंचि यिट्ठं च हुतं च लोके,
संवच्छरं यजेथ पुञ्ञपेक्खो ।
सब्बम्पि तं न चतुभागमेति,
अभिवादना उज्जुगतेसु सेय्यो ॥९॥

पुण्य संपादन करण्याच्या हेतूने मनुष्याने जरी वर्षभर यज्ञ आणि हवन केलें तरी तें पुण्य शुद्धात्म्यास केलेल्या नमस्काराने प्राप्त होणाऱ्या पुण्याची एक चतुर्थांश सुद्धा बरोबरी करूं शकत नाही.

अरण्यकुटि दीर्घायु कुमार

१०९ अभिवादनसीलिस्स निच्चं वुड्ढापचायिनो ।
चत्तारो धम्मा वड्ढन्ति आयु वण्णो सुखं बलं ॥१०॥

जो अभिवादन शील आहे व जो नेहमी वृद्धांची सेवा करितो त्याच्या चार गोष्टी वाढतात—आयु, वर्ण, सुख आणि बल.

जेतवन संकिच्च (श्रामणेर)

११० यो च वस्ससतं जीवे दुस्सीलो असमाहितो ।
एकाहं जीवितं सेय्यो सीलवन्तस्स झायिनो ॥११॥

दुराचारी व संयमहीन शंभर वर्षे जगण्यापेक्षा शीलसंपन्न एकाग्र-चित्त एक दिवस जगणें बरें.

जेतवन कोण्डञ्ञ (थेर)

१११ यो च वस्ससतं जीवे दुप्पञ्ञो असमाहितो ।
एकाहं जीवितं सेय्यो पञ्ञावन्तस्स झायिनो ॥१२॥

दुष्प्रज्ञ आणि संयमहीन शंभर वर्षे जगण्यापेक्षा प्रज्ञायुक्त आणि एकाग्रचित्त एक वर्ष जगणें बरें.

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

जेतवन सप्पदास (थेर)

११२ यो च वस्ससतं जीवे कुसीतो हीनवीरियो ।
एकाहं जीवितं सेय्यो विरियमारभतो दल्हं ॥१३॥

आळशी व निरुद्योगी शंभर वर्षें जगण्यापेक्षा एक दिवस वीर्यवन्त जगणें बरें.

जेतवन पटाचारा (थेरी)

११३ यो च वस्ससतं जीवे अपस्सं उदयव्ययं ।
एकाहं जीवितं सेय्यो पस्सतो उदयव्ययं ॥१४॥

उत्पत्ति आणि विनाश यांचा विचार न करितां शंभर वर्षें जगण्यापेक्षा उत्पत्ति आणि विनाश ह्यात मननशील राहून एक दिवस जगणें श्रेष्ठ आहे.

जेतवन किसा गोतमी

११४ यो च वस्ससतं जीवे अपस्सं अमतं पदं ।
एकाहं जीवितं सेय्यो पस्सतो अमतं पदं ॥१५॥

अमृतपदाची अथवा अमरत्वाची (निर्वाणाची) प्राप्ति न करिता शंभर वर्षें जगण्यापेक्षा अमरपदयुक्त एक दिवस जगणें बरें.

जेतवन बहुपुत्तिका (थेरी)

११५ यो च वस्ससतं जीवे अपस्सं धम्ममुत्तमं ।
एकाहं जीवित सेय्यो पस्सतो धम्ममुत्तमं ॥१६॥

उत्तम धर्म न जाणता शंभर वर्षें जगण्यापेक्षा उत्तम धर्मयुक्त एक दिवस जगणें बरें.

# ९ पाप वर्ग

जेतवन (चूळ) एकशाटक (ब्राह्मण)

११६ अभित्थरेथ कल्याणे पापा चित्तं निवारये ।
दन्धं हि करोतो पुञ्ञं पापस्मिं रमते मनो ॥१॥

पुण्य करण्यांत मनुष्याने त्वरा करावी; पापापासून मनाला परावृत्त करावें. पुण्य करण्यांत जर त्याने ढिलाई केली तर त्याचें मन पापांत रममाण होतें.

जेतवन सेय्यसक (थेर)

११७ पापञ्चे पुरिसो कयिरा न तं कयिरा पुनप्पुनं ।
न तम्हि छन्दं कयिराथ दुक्खो पापस्स उच्चयो ॥२॥

जें पापकर्म केलें तें मनुष्याने पुनः पुनः करूं नये. पापकर्मांची इच्छा त्याने बाळगूं नये. कारण पापाचा संचय दुःखास कारणीभूत होतो.

जेतवन लाजदेवकी कन्या

११८ पुञ्ञञ्चे पुरिसो कयिरा कयिराथेनं पुनप्पुनं ।
तम्हि छन्दं कयिराथ सुखो पुञ्ञस्स उच्चयो ॥३॥

जर मनुष्याने पुण्य केलें तर तें त्याने पुनः पुनः करावें त्याचा त्याने छंद लावावा. पुण्याचा संचय सुखाला कारणीभूत होतो.

जेतवन अनाथपिण्डिक (सेठ)

११९ पापोपि पस्सति भद्रं याव पापं न पच्चति ।
यदा च पच्चति पापं अथ पापो पापानि पस्सति ॥४॥

जोपर्यंत पापाचा विपाक होत नाही तोपर्यंत पापी माणसाला पाप सुद्धा बरें वाटतें. पण जेव्हा पापाची फळें दिसूं लागतात तेव्हा तो त्याचें खरें स्वरूप ओळखतो.

१२० भद्रोपि पस्सति पापं याव भद्रं न पच्चति ।
यदा च पच्चति भद्रं अथ भद्रो भद्रानि पस्सति ॥५॥

जोपर्यंत पुण्याचा विपाक होत नाही तोपर्यंत पुण्य सुद्धा वाईटच दिसतें. परंतु जेव्हा पुण्याचीं फळें दिसूं लागतात तेव्हा मनुष्य पुण्याचें खरें स्वरूप ओळखतो.

जेतवन — असंयमी (भिक्षु)

१२१ मावमञ्ञेथ पापस्स न मन्तं आगमिस्सति ।
उदबिन्दु निपातेन उदकुम्भोपि पूरति
बालो पूरति पापस्स थोक-थोकम्पि आचिनं ॥६॥

'तें मला स्पर्श करणार नाही' असें म्हणून पापाची अवहेलना करूं नये. थेंब थेंब पाण्याने जसें मडकें भरतें त्याचप्रमाणे थोडें थोडें पाप करून मूर्ख आपल्या पापाचा घडा भरतो.

जेतवन — बिलालपाद (सेठ)

१२२ मावमञ्ञेथ पुञ्ञस्स न मन्तं आगमिस्सति ।
उदबिन्दुनिपातेन उदकुम्भोपि पूरति ।
धीरो पूरति पुञ्ञस्स थोक-थोकम्पि आचिनं ॥७॥

'तें मला मिळणार नाही' असे म्हणून मनुष्याने पुण्याला दूर लोटूं नये. थेंब थेंब पाण्याने जसें मडकें भरतें त्याचप्रमाणे बुद्धिमान् पुरुष थोडें थोडें करून पुण्याचा संचय करितो.

जेतवन — महाधन (वाणिज)

१२३ वाणिजो 'व भयं मग्गं अप्पसत्थो महद्धनो ।
विसं जीवितुकामो 'व पापानि परिवज्जये ॥८॥

अल्पसाधन धनवान व्यापारी ज्याप्रमाणे भययुक्त मार्ग टाळतो, किंवा जगण्याची इच्छा करणारा मनुष्य ज्याप्रमाणे विष टाळतो त्याच-प्रमाणे मनुष्याने पाप टाळावें.

वेळुवन — कुक्कुटमित्त

१२४ पाणिम्हि चे वणो नास्स हरेय्य पाणिना विसं ।
नाब्बणं विसमन्वेति नत्थि पापं अकुब्बतो ॥९॥

हाताला जर जखम नसेल तर मनुष्य हातावर विष घेऊं शकतो; कारण विन जखमी शरीराला विष बाधत नाही. त्याचप्रमाणे न करणाराला पाप लागत नाही.

जेतवन — कोक:

१२५ यो अप्पदुट्ठस्स नरस्स दुस्सति
सुद्धस्स पोसस्स अनङ्गणस्स ।
तमेव बालं पच्चेति पापं,
सुखुमो रजो पटिवातं' व खित्तो ॥१०॥

जो दोषरहित शुद्ध निर्मल पुरुषाला दोष लावतो त्यालाच उलटून पाप लागतें—ज्याप्रमाणे सूक्ष्म धूळ हवेच्या विरुद्ध दिशेने फेकल्यावर ती फेकणारावरच परत येते.

जेतवन — तिस्स (थेर).

१२६ गब्भमेके उप्पज्जन्ति निरयं पापकम्मिनो ।
सग्गं सुगतिनो यन्ति, परिनिब्बन्ति अनासवा ॥११॥

काही लोक गर्भात उत्पन्न होतात; कांही पापकर्मी नरकांत जातात; पुण्यवान लोक स्वर्गाला जातात व मलरहित पुरुष निर्वाणपद गाठतात.

जेतवन — ३ भिक्षु

१२७ न अन्तलिक्खे न समुद्दमज्झे
न पब्बतानं विवरं पविस्स ।
न विज्जती सो जगतिप्पदेसो
यत्थट्ठितो मुञ्चेय्य पापकम्मा ॥१२॥

विरिञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

आकाशांत किंवा समुद्राच्या पोटांत किंवा पर्वताच्या गुहेंत असा जगांत कोणताहि प्रदेश नाही की जेथे राहून पापी मनुष्य आपल्या पाप-कर्मांच्या फळापासून वाचूं शकेल.

कपिल वस्तु (न्यग्रोधाराम) सुप्पबुद्ध (शाक्य)

१२८ न अन्तलिक्खे न समुद्दमज्झे
न पब्बतानं विवरं पविस्स ।
न विज्जती सो जगतिप्पदेसो
यत्थट्ठितं नप्पसहेय्य मच्चू ॥१३॥

आकाशांत किंवा समुद्राच्या पोटांत किंवा पर्वताच्या गुहेंत असा जगांत कोणताहि प्रदेश नाही की जेथे राहून मनुष्य मृत्यूच्या तावडींतून सुटूं शकेल.

---

## १० दण्डवग्ग

जेतवने छब्बग्गिय (भिक्षु)

१२९ सब्बे तसन्ति दण्डस्स सब्बे भायन्ति मच्चुनो ।
अत्तानं उपमं कत्वा न हनेय्य न घातये ॥१॥

दंडाला सर्वच त्रासतात. मृत्यूला सर्वच भितात. आपल्या समान इतरांना समजून कोणाला मारूं नये किंवा मारवूं नये.

१३० सब्बे तसन्ति दण्डस्स सब्बेसं जीवितं पियं ।
अत्तानं उपमं कत्वा न हनेय्य न घातये ॥२॥

दंडाला सर्वच भितात. सर्वांनाच जीवन प्रिय आहे. आपल्या समान इतरांना समजून कोणाला मारूं नये किंवा मारवूं नये.

जेतवन पुष्कळ मुलें

१३१ सुखकामानि भूतानि यो दण्डेन विहिंसति ।
अत्तनो सुखमेसानो पेच्च सो न लभते सुखं ॥३॥

सुख इच्छिणाऱ्या जीवांची जो सुखलोलुप दण्डाने हिंसा करितो तो सुखी नसतो.

१३२ सुखकामानि यो दण्डेन न हिंसति ।
अत्तनो सुखमेसानो पेच्च सो लभते सुखं ॥४॥

सुख इच्छिणाऱ्या जीवांना जो मनुष्य आपल्या सुखाकरिता दण्डानें मारीत नाही तो पुढे सुख पावतो.

जेतवन कुण्डधान (थेर)

१३३ मा वोच फरुसं कञ्चि वुत्ता पटिवदेय्युं तं ।
दुक्खा हि सारम्भकथा पटिदण्डा फुसेय्युं तं ॥५॥

१३४ सचे नेरेसि अत्तानं कंसो उपहतो यथा ।
एस पत्तोसि निब्बानं सारम्भो ते न विज्जति ॥६॥

कठोर वचन बोलूं नये. कारण बोलल्यावर दुसरेहि पण तुम्हाला तसेंच बोलतील. दुर्वचन दुःखदायक असतें. त्याऐवजी प्रत्युत्तरादाखल तुम्हाला दण्ड मिळेल. फुटलेल्या घंटेप्रमाणे जर तुम्ही स्तब्ध राहिला तर तुम्ही केव्हाच निर्वाण प्राप्त केलें आहे; कारण तुमच्यांत क्रोध उरलेला नाही.

श्रावस्ती (पूर्वाराम) विशाखा आदि उपासिका

१३५ यथा दण्डेन गोपालो गावो पाजेति गोचरं ।
एवं जरा च मच्चू च आयुं पाजेन्ति पाणिनं ॥७॥

ज्याप्रमाणे गुराखी गुरांना दण्डाने कुरणाकडे नेतो त्याप्रमाणे म्हातारपण व मृत्यु प्राण्यांच्या आयुष्याला हांकित नेतात.

---

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

राजगृह ( वेणुवन ) अजगर (प्रेत)

१३६ अथ पापानि कम्मानि करं बालो न बुज्झति
सेहि कम्मेहि दुम्मेधो अग्गिदड्ढो' व तप्पति ॥८॥

पापकर्मे करतांना मूर्खाला वाटत नाही की आपण काही वाईट करितो. नंतर तो पापी आपल्याच पापकर्मांमुळे जळून दुःखी होतो.

राजगृह (वेणुवन) महामोग्गल्लान (थेर)

१३७ यो दण्डेन अदण्डेसु अप्पदुट्ठेसु दुस्सति ।
दसन्नमञ्जतरं ठानं खिप्पमेव निगच्छति ॥९॥

१३८ वेदनं फरुसं जानिं सरीरस्स च भेदनं ।
गरुकं वापि आबाधं चित्तक्खेपं व पापुणे ॥१०॥

१३९ राजतो वा उपस्सग्गं अब्भक्खानं व दारुणं ।
परिक्खयं व ञातीनं भोगानं व पभङ्गुणं ॥११॥

१४० अथवस्स अगारानि अग्गी डहति पावको ।
कायस्स भेदा दुप्पञ्ञो निरयं सोपपज्जति ॥१२॥

जो दण्डाला अपात्र असलेल्या पुरुषांना दण्डाने ताडतो, जो निर्दोषी लोकांना दूषण लावतो त्याला तावडतोब खालील दहांपैकी एखादी आपत्ति भोगावी लागते:—तीव्र वेदना, हानि, अंग-भंग होणें, मोठा आजार येणें, चित्त-विक्षेप अथवा वेडेपण, राजदण्ड, दुःसहनिन्दा, ज्ञाति-बांधवांचा विनाश, भोगांचा क्षय, घराला आग लागणें; मरणानंतर तो दुर्बुद्धि नरकाला जातो.

जेतवन बहुभण्डिक (भिक्षु)

१४१ न नग्गचरिया न जटा न पङ्का
नानासका थण्डिलसायिका वा ।
रजोवजल्लं उक्कुटिकप्पधानं
सोधेन्ति मच्चं अवितिण्णकङ्खं ॥१३॥

ज्या मनुष्याच्या आकांक्षा नष्ट झाल्या नाहीत त्याची शुद्धि नागवे राहिल्याने, जटा वाढविल्याने, शरीराला माती लावल्याने, उपवास केल्याने, कठिण भूमिवर झोपल्याने, धूळ लावल्याने किंवा उक्कड बसल्याने होत नाही.

जेतवन — सन्तति (महामात्य)

१४२ अलङ्कतो चेपि समं चरेय्य
सन्तो दन्तो नियतो ब्रह्मचारी ।
सब्बेसु भूतेसु निधाय दण्डं
सो ब्राह्मणो सो समणो स भिक्खू ॥१४॥

अलंकृत असून सुद्धा जर एखादा मनुष्य शान्त, दान्त, नियमतत्पर, ब्रह्मचारी त्याचप्रमाणे सर्व प्राण्यांचे बाबतीत दंडत्यागी आहे तर तोच ब्राह्मण, तोच श्रमण व तोच भिक्षु जाणावा.

जेतवन — पिलोतिक (थेर)

१४३ हिरीनिसेधो पुरिसो कोचि लोकस्मि विज्जति ।
यो निन्दं अप्पबोधति अस्सो भद्रो कसामिव ॥१५॥

ह्या जगांत कांही पुरुष असे असतात की जे स्वतःच लज्जा बाळगून निषिद्ध कर्म करीत नाहीत. ज्याप्रमाणे उत्तम घोडा चाबूक सहन करीत नाही त्याचप्रमाणे असले पुरुष निन्दा सहन करीत नाहीत.

१४४ अस्सो यथा भद्रो कसानि विट्ठो
आतापिनो संवेगिनो भवाथ ।
सद्धाय सीलेन च वीरियेन च
समाधिना धम्मविनिच्छयेन च ।
सम्पन्न विज्जाचरणा पतिस्सता
पहस्सथा दुक्खमिदं अनप्पकं ॥१६॥

चाबूक खालेल्या उत्तम घोड्याप्रमाणे उद्योगशील व वेगवान व्हा; श्रद्धा, आचार, वीर्य, समाधि यांनी युक्त होऊन, विद्या आणि

---

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

आचरण संपन्न राहून स्मृतिमान बना आणि आपल्या दुःखाचा अन्त करा.

१४५ उदकं हि नयन्ति नेत्तिका
उसुकारा नमयन्ति तेजनं ।
दारुं नमयन्ति तच्छका
अत्तानं दमयन्ति सुब्बता ॥१७॥

पाटकार माळी कालव्यांतून लागेल तिकडे पाणि नेतो, बाणकार बाणाला नीट वळवितो, सुतार लाकडाला वळण देतो आणि सुंदर व्रत पाळणारे लोक आपले दमन करितात,

---

## ११ जरा–वर्ग

जेतवन — विशाखाची सभा

१४६ कोनु हासो किमानन्दो निच्चं पज्जलिते सति ।
अन्धकारेन ओनद्धा पदीपं न गवेस्सथ ॥१॥

नेहमीच अग्नि भडकला असतां तुम्हाला हासणें व आनंद कसा सुचतो ? अन्धकारानें ग्रासिलें असता तुम्ही प्रदीप कां शोधीत नाही ?

राजगृह (वेणुवन) — सिरिमा

१४७ पस्स चित्तकतं बिम्बं अरुकायं समुस्सितं ।
आतुरं बहुसङ्कप्पं यस्स नत्थि धुवं ठिति ॥२॥

हे विचित्र रूप पहा, जे रोग–ग्रस्त फुगलेले व व्याकुळ त्याच–प्रमाणें अनेक संकल्पानें युक्त असून ज्याची स्थिति अनित्य आहे.

जेतवन — उत्तरा (थेरी)

१४८ परिजिण्णमिदं रूपं रोगनिड्डं पभङ्गुरं ।
भिज्जति पूतिसन्देहो मरणन्तं हि जीवितं ॥३॥

हें शरीर जीर्ण होणारें आहे. तें रोगाचें माहेरघर असून क्षण-भंगुर आहे. तें ठिसूळ असल्यामुळें फुटून जातें. जीवनाचा अन्त मरणांत होतो.

जेतवन                                                  अधिमान (भिक्षु

१४९  यानि मानि अपत्थानि अलाबूनेव सारदे ।
कापोतकानि अट्ठीनि तानि दिस्वान का रति ॥४॥

शरद ऋतूंत फेंकून दिलेल्या अपथ्य भोपळ्याप्रमाणे अथव -कबूतरासारखी (पांढरी) हाडें पाहून कोण (त्या शरीरांत) आरान -राहील !

जेतवन                                                  रूपनन्दा (भि

१५०  अट्ठीनं नगरं कतं मंसलोहितलेपनं ।
यत्थ जरा च मच्चू च मानो मक्खोच ओहितो ॥५॥

(हें शरीर ) हाडांचा नगर–किल्ला आहे–ज्यावर मांस आणि रक्ताचें लेपन चढलेलें आहे व ज्यांत जरा, मृत्यु, अभिमान आणि द्वेष लपून बसलेले आहेत.

जेतवन                                                  मल्लिकादेवी

१५१  जीरन्ति वे राजरथा सुचित्ता
अथो सरीरम्पि जरं उपेति ।
सतं च धम्मो न जरं उपेति
सन्तो हवे सब्भि पवेदयन्ति ॥६॥

राजांचे सुचित्रित रथ जीर्ण होतात, त्याचप्रमाणे हें शरीर सुद्ध -जीर्ण होतें. परंतु सन्तांचा धर्म जीर्ण होत नाही, सन्त लोक सन्तान हेंच सांगत आले आहेत.

विरंचिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

जेतवन लाल (उदायी) थेर

१५२ अप्पस्सुतायं पुरिसो बलिवद्दो' व जीरति ।
मंसानि तस्स वड्ढन्ति पञ्ञा तस्स न वड्ढति ॥७॥

अल्पश्रुत मनुष्य बैलाप्रमाणे वाढतो. त्याचें मांस वाढतें पण प्रज्ञा वाढत नाही.

१५३ अनेकजातिसंसारं सन्धाविस्सं अनिब्बिसं ।
गहकारकं गवेसन्तो दुक्खा जाति पुनप्पुनं ॥८॥

१५४ गहकारक ! दिट्ठोसि पुन गेहं न काहसि ।
सब्बा ते फासुका भग्गा गहकूटं विसङ्खितं ।
विसङ्खारगतं चित्तं तण्हानं खयमज्झगा ॥९॥

गृहनिर्माण कर्त्याच्या शोधांत अनेक जन्म मी संसारांत सारखा भटकत राहिलों. वारंवार जन्म घेणें दुःखमय आहे. हे गृहकारका ! आता मी तुला पाहिलें आहे, आता पुनः तूं घर करूं शकत नाही. तुझे सर्व वांसे तुटले आहेत. आढेहि मोडलें आहे. चित्त संस्काररहित झालें आहे. सर्व तृष्णाचा क्षय झाला आहे.

वाराणसी (ऋषिपतन) महाधनी शेटाचा पुत्र

१५५ अचरित्वा ब्रह्मचरियं अलद्धा योब्बने धनं ।
जिण्णकोंचा'व झायन्ति खीणमच्छे'व पल्लले ॥१०॥

ज्या मनुष्याने ब्रह्मचर्याचें पालन केलें नाही अथवा तारुण्यांत धन मिळविलें नाही असा मनुष्य म्हातारपणीं, ज्या तलावांतील मासे संपले आहेत अशा तलावात असलेल्या म्हाताऱ्या क्रौंच पक्षाप्रमाणे चिंताग्रस्त असतो.

१५६ अचरित्वा ब्रह्मचरियं अलद्धा योब्बनें धनं ।
सेन्ति चापातिखीणा' व पुराणानि अनुत्थुनं ॥११॥

ज्या मनुष्याने ब्रम्हचर्याचें पालन केलें नाही किंवा तारुण्यांत धन संपादन केलें नाही असा मनुष्य वृद्धावस्थेंत जुन्या धनुष्याप्रमाणे नुसत्या भूतकाळाचीच चर्चा करितो.

---

## १२ अत्त-वर्ग

सुंसुमारगिरि (भेसकलावन) बोधि राजकुमार

१५७ अत्तानं चे पियं जञ्ञा रक्खेय्य नं सुरक्खितं ।
तिण्णमञ्ञतरं यामं पटिजग्गेय्य पण्डितो ॥१॥

मनुष्य जर स्वतःवर प्रेम करितो तर त्याने आपल्याला सुरक्षित ठेवावें. तीन यामांतून एक याम तरी पण्डिताने जागे रहावें.

जेतवन (शाक्य पुत्र) उपनन्द थेर

१५८ अत्तानं एव पठमं पटिरूपे निवेसये ।
अथञ्ञमनुसासेय्य न किलिस्सेय्य पण्डितो ॥२॥

प्रथम आपल्या स्वतःलाच उचित मार्गाला लावावें. नंतर दुसऱ्याला उपदेश द्यावा. असें केल्यानें पण्डित क्लेश भोगणार नाही.

जेतवन (अभ्यास) तिस्स (थेर)

१५९ अत्तानं चे तथा कयिरा यथञ्ञमनुसासति ।
सुदन्तो वत दम्मेथ अत्ता हि किर दुद्दमो ॥३॥

आपल्यालाच आपण तसें करावें, जसें मनण्याला आपण दुसऱ्याला उपदेश देतो. प्रथम आपणच आपलें नीट दमन करावें; वास्तविक स्वतःला दमन करणेंच कठीण आहे.

जेतवन कुमार कस्सपची आई (थेरी)

१६० अत्ता हि अत्तनो नाथो को हि नाथो परो सिया ।
अत्तना हि सुदन्तेन नाथं लभति दुल्लभं ॥४॥

---

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

मनुष्य स्वतःच स्वतःचा स्वामी आहे; दुसरा कोण श्रेष्ठ स्वामी राहू शकतो ? मनुष्य जेव्हा आपले नीट दमन करितो तेव्हा त्या सारखा दुसरा नाथ मिळणें कठीण आहे.

जेतवन — महाकाल (उपासक)

१६१ अत्तना'व कतं पापं अत्तजं अत्तसम्भवं ।
अभिमन्थन्ति दुम्मेधं वजिरं' व' स्ममयं मणिं ॥५॥

आपण केलेलें पाप आपल्यापासूनच जन्म पावतें, आपल्यापासूनच उद्भवतें व तें दुष्ट पुरुषाला दुःखी करितें—जसें दगडांतून उत्पन्न झालेला हिरा दगडयाच्याच मण्याचें छेदन करितो.

जेतवन — देवदत्त

१६२ यस्सच्चन्तदुस्सील्यं मालुवा सालमिवोततं ।
करोति सो तथत्तान यथा'नं इच्छति दिसो ॥६॥

साल वृक्षाला संपूर्णपणें आच्छादित करणाऱ्या मालु—लतेप्रमाणे पाप जेव्हा सर्व बाजूंनी दुराचारी पुरुषाला घेरून टाकतें तेव्हा तो दुराचारी तसेंच वागतो जसें त्याचे वैरी इच्छितात.

राजगृह (वेणुवन) — संघांत फूट पडली तेव्हा

१६३ सुकरानि असाधूनि अत्तनो अहितानि च ।
यं वे हितं च साधुच तं वे परमदुक्करं ॥७॥

वाईट करणें फार सोपें आहे; तसेंच आपलें अहित करणें सोपें आहे. पण जें हितकर व चांगलें आहे तें करणें फार कठीण आहे.

जेतवन — काल (थेर)

१६४ यो सासनं अरहतं अरियानं धम्मजीविनं ।
पटिक्कोसति दुम्मेधो दिट्ठिं निस्साय पापिकं ।
फलानि कट्ठकस्सेव अत्तघञ्ञाय फल्लति ॥८॥

: ज्या मनुष्याने ब्रम्हचर्याचें पालन केलें नाही किंवा तारुण्यांत धन संपादन केलें नाही असा मनुष्य वृद्धावस्थेंत जुन्या धनुष्याप्रमाणे नुसत्या भूतकाळाचीच चर्चा करितो.

---

## १२ अत्त-वर्ग

सुंसुमारगिरि (भेसकलावन) — बोधि राजकुमार

१५७ अत्तानं चे पियं जञ्ञा रक्खेय्य नं सुरक्खितं ।
तिण्णमञ्ञतरं यामं पटिजग्गेय्य पण्डितो ॥१॥

मनुष्य जर स्वतःवर प्रेम करितो तर त्याने आपल्याला सुरक्षित ठेवावे. तीन यामांतून एक याम तरी पण्डिताने जागे रहावे.

जेतवन — (शाक्य पुत्र) उपनन्द थेर

१५८ अत्तानमेव पठमं पतिरूपे निवेसये ।
अथञ्ञमनुसासेय्य न किलिस्सेय्य पण्डितो ॥२॥

प्रथम आपल्या स्वतःलाच उचित मार्गाला लावावे, नंतर दुसऱ्याला उपदेश द्यावा. असें केल्याने पण्डित क्लेश भोगणार नाही.

जेतवन — (अभ्यास) तिस्स (थेर)

१५९ अत्तानं चे तथा कयिरा यथञ्ञमनुसासति ।
सुदन्तो वत दम्मेथ अत्ता हि किर दुद्दमो ॥३॥

आपल्यालाच आपण तसें करावें, जसें म्हणण्याला आपण दुसऱ्याला उपदेश देतो. प्रथम आपणच आपलें नीट दमन करावें; वास्तविक स्वतःला दमन करणेंच कठीण आहे.

जेतवन — कुमार कस्सपची आई (थेरी)

१६० अत्ता हि अत्तनो नाथो को हि नाथो परो सिया ।
अत्तना हि सुदन्तेन नाथं लभति दुल्लभं ॥४॥

विरहिना महोत्पन्न पापाहात्मनराः
मुद सर्पाणि पापानि सर्वं स्वानिकतो भगः॥

मनुष्य स्वतःच स्वतःचा स्वामी आहे; दुसरा कोण श्रेष्ठ स्वामी राहूं शकतो ? मनुष्य जेव्हा आपले नीट दमन करितो तेव्हा त्या सारखा दुसरा नाथ मिळणें कठीण आहे.

जेतवन | महाकाल (उपासक)

१६१ अत्तना'व कतं पापं अत्तजं अत्तसम्भवं ।
अभिमन्थति दुम्मेधं वजिरं' व' स्ममयं मणिं ॥५॥

आपण केलेलें पाप आपल्यापासूनच जन्म पावतें, आपल्यापासूनच उत्पन्न होतें व तें दुष्ट पुरुषाला दुःखी करितें—जसें दगडांतून उत्पन्न झालेला हिरा दगडयाच्याच मण्याचें छेदन करितो.

जेतवन | देवदत्त

१६२ यस्सच्चन्तदुस्सील्यं मालुवा सालमिवोततं ।
करोति सो तथत्तान यथा'नं इच्छति दिसो ॥६॥

शाल वृक्षाला संपूर्णपणें आच्छादित करणाऱ्या मालु-लतेप्रमाणे पाप जेव्हा सर्व बाजूंनी दुराचारी पुरुषाला घेरुन टाकतें तेव्हा तो दुराचारी तसेंच वागतो, जसें त्याचे वैरी इच्छितात.

राजगृह (वेणुवन) | संघांत फूट पडली तेव्हा

१६३ सुकरानि असाधूनि अत्तनो अहितानि च ।
यं वे हितं च साधुं च तं वे परमदुक्करं ॥७॥

वाईट करणें फार सोपें आहे; तसेंच आपलें अहित करणें सोपें आहे. पण जें हितकर व चांगलें आहे तें करणें फार कठीण आहे.

जेतवन | काल (थेर)

१६४ यो सासनं अरहतं अरियानं धम्मजीविनं ।
पटिक्कोसति दुम्मेधो दिट्ठिं निस्साय पापिकं ।
फलानि कट्ठकस्सेव अत्तघञ्ञाय फल्लति ॥८॥

जो दुरात्मा आपल्या पापमयी मिथ्या धारणेमुळे धर्माप्रमाणे आचरण करणाऱ्या अरहन्तांच्या आर्य धर्माला दूषण लावतो तो आपल्याच विनाश ओढवून घेतो—जसें वेळूचें फूल वेळूच्याच नाशाला कारणीभूत होतें.

जेतवन (चुल्ल) काल (उपासक).

१६५ अत्तना' व कतं पापं अत्तना संकिलिस्सति ।
अत्तना अकतं पापं अत्तना' व विसुज्झति ।
सुद्धि असुद्धि पच्चत्तं नाञ्ञमञ्ञो विसोधये ॥९॥

आपण केलेलें पापच आपल्याला मलीन करितें व आपण न केलेलें पाप आपल्याला शुद्ध करितें. शुद्धि आणि अशुद्धि ह्या स्वतःवरच अवलंबून असतात. दुसरा कोणी इतराला शुद्ध करूं शकत नाही.

जेतवन अत्त दत्थ (थेर)

१६६ अत्तदत्थं परत्थेन बहुनापि न हापये ।
अत्तदत्थं अभिञ्ञाय सदत्थपसुतो सिया ॥१०॥

दुसऱ्याचा पुष्कळ लाभ साधण्याकरितां सुद्धां मनुष्यानें आपलें अनहित करूं नये. आपलें हित नीट जाणून मनुष्यानें सदर्थ अथवा परमार्थ साधावा.

---

## १३ लोक-वर्ग

जेतवन कोणी अल्पवयस्क भिक्षु

१६७ हीनं धम्मं न सेवेय्य, पमादेन न संवसे ।
मिच्छादिट्ठिं न सेवेय्य न सिया लोक-वड्ढनो ॥१॥

नीच धर्मांचें सेवन करूं नये; प्रमत्त राहूं नये; मिथ्या धारणा धारूं नये न जन्ममरणाचें चक्र वाढवूं नये.

पुट सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

कपिलवस्तु (न्यग्रोधाराम) — शुद्धोदन

१६८ उत्तिट्ठे नप्पमज्जेय्य धम्मं सुचरितं चरे ।
धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च ॥२॥

उठावें, प्रमाद पाळूं नये, धर्माचरण करावें. धर्माने वागणारा पुरुष इह त्याचप्रमाणे परलोकात सुखाने झोपतो.

१६९ धम्मं चरे सुचरितं न तं दुच्चरितं चरे ।
धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च ॥३॥

धर्मांप्रमाणे सदाचरण करावें, दुराचरण करूं नये. धर्माने वागणारा पुरुष इह त्याचप्रमाणे परलोकात सुखानें झोपतो.

जेतवन — पांचशें ज्ञानी-भिक्षु

१७० यथा बुब्बुळकं पस्से यथा पस्से मरीचिकं ।
एवं लोकं अवेक्खन्तं मच्चुराजा न पस्सति ॥४॥

*जो इहलोकाला बुडबुड्याप्रमाणे किंवा मृगजळाप्रमाणे क्षणभंगुर जाणतो त्याजकडे यमराज पाहत नाही.*

राजगृह (वेणुवन) — अभय राजकुमार

१७१ एथ पस्सथिमं लोकं चित्तं राजरथूपमं ।
यत्थ बाला विसीदन्ति, नत्थि सङ्गो विजानतं ॥५॥

या आणि राज-रथाप्रमाणे सजलेल्या ह्या जगाकडे पहा; मूर्ख लोक त्यांत फसतात. पण ज्ञानी लोक त्यांत आसक्त नसतात.

जेतवन — सम्मुञ्जानि

१७२ यो च पुब्बे पमज्जित्वा पच्छा सो नप्पमज्जति ।
सोऽमं लोकं पभासेति अब्भा मुत्तो'व चन्दिमा ॥६॥

जो पूर्वी प्रमत्त होता पण नंतर अप्रमत्त झाला असा पुरुष मेघांतून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणे जगाला प्रकाशित करितो.

जेतवन — अंगुलिमाल (थेर)

१७३ यस्स पापं कतं कम्मं कुसलेन पिधिय्यति ।
सो'मं लोकं पभासेति अब्भा मुत्तो'व चन्दिमा ॥७॥

(मागो) केलेलें पाप ज्याच्या ( नंतरच्या ) पुण्यकर्मानें झाकलें गेलें असा पुरुष ढगांतून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणे जगाला प्रकाशित करितो.

आलवी — रंगाऱ्याची कन्या

१७४ अन्धभूतो अयं लोको तनुके'त्थ विपस्सति ।
सकुन्तो जालमुत्तो'व अप्पो सग्गाय गच्छति ॥८॥

हें जग आंधळें आहे; त्यांत फार थोडे लोक असे आहेत की जे पाहूं शकतात व जाळ्यांतून मुक्त झालेल्या पक्ष्याप्रमाणे स्वर्गाला जातात.

जेतवन — तीस भिक्षु

१७५ हंसादिच्चपथे यन्ति आकासे यन्ति इद्धिया ।
नीयन्ति धीरा लोकम्हा जेत्वा मारं सवाहिनिं ॥९॥

हंस प्रकाशांत उडतात; ऋद्धिमान आकाशांत उडतात. सेनेसह माराला जिंकून बुद्धिमान् लोक संसारांतून मुक्त होतात.

जेतवन — चिंचा ( माणविका )

१७६ एकं धम्मं अतीतस्स मुसावादिस्स जन्तुनो ।
वितिण्णपरलोकस्स नत्थि पापं अकारियं ॥१०॥

एका सत्य धर्माचें अतिक्रमण करून जो खोटें बोलतो, जो परलोक जाणत नाही असा पुरुष करणार नाही असें कोणतेंच पाप नाही.

जेतवन — ( अतुल्य दान )

१७७ न वे कदरिया देवलोकं वजन्ति
बाला ह वे न प्पसंसन्ति दानं ।
धीरो च दानं अनुमोदमानो
तेनेव सो होति सुखी परत्थ ॥११॥

नुद सर्वाणि पापानि दर्प स्वस्तिकरो भव॥

कंजूष लोक देवलोकाला जात नाहीत. मूर्खच दानाची प्रशंसा करीत नाहीत. धीर लोक दानाचें अनुमोदन करितात व त्यायोगेंच ते परलोकांत सुखी होतात.

जेतवन — अनाथपिण्डिकाच्या मुलाचें मरण

१७८ पथव्या एकरज्जेन सग्गस्स गमनेन वा ।
सब्ब लोकाधिपच्चेन सोतापत्ति*फलं वरं ॥१३॥

पृथ्वीवर सार्वभौमत्व, स्वर्गगति अथवा सर्व विश्वाचें साम्राज्य या सर्वांपेक्षा स्रोतापत्तिफलप्राप्ति श्रेष्ठ आहे.

---

## १४ बुद्ध-वर्ग

*उरुवेला (बोधिमंड)* — *मागन्दिय (ब्राह्मण)*

१७९ यस्स जितं नावजीयति
जितमस्स नो याति कोचि लोके
तं बुद्धमनन्तगोचरं अपदं केन पदेन नेस्सथ ॥१॥

ज्याचा विजय अविजय होऊं शकत नाही व ज्याच्या विजयाची या जगांत कोणीहि बरोबरी करूं शकत नाही अशा अनन्तत्वाला पोच-लेल्या बुद्धाला कोणत्या मार्गानें पदच्युत करतां येतें ?

१८० यस्स जालिनी विसत्तिका
तण्हा नत्थि कुहिञ्चि नेतवे ।
तं बुद्धमनन्तगोचरं अपदं केन पदेन नेस्सथ ॥२॥

बंधनांत टाकणारी विषरूपी तृष्णा ज्याला कोठेंच नेऊं शकत नाही अशा अनन्तत्वाला पोचलेल्या बुद्धाला कसें पदच्युत करितां येईल ?

---

* भगवान् बुद्धाच्या श्रावक संघाचे चार प्रकार आहेतः—
(१) सोतापन्न (२) सकृदागामी (३) अनागामी (४) अर्हत्.

संकाश्य नगर — देव मनुष्य

१८१ ये झानपसुता धीरा नेक्खम्मूपसमे रता ।
देवापि तेसं पिहयन्ति सम्बुद्धानं सतीमतं ॥३॥

जे धीर ध्यानांत मग्न आहेत, जे निष्काम कर्मांत व समाधींत रममाण आहेत. अशा स्मृतिमान् बुद्धांची देव देखील स्पृहा करितात.

वाराणसी — एरकपत्त (नागराज)

१८२ किच्छो मनुस्सपटिलाभो किच्छं मच्चानं जीवितं ।
किच्छं सद्धम्मसवणं किच्छो बुद्धानं उप्पादो ॥४॥

मनुष्य योनींत जन्मास येणें कठीण आहे; मर्त्यांचें जीवन कठीण आहे; सद्धर्माचें श्रवण कठीण आहे; बुद्धांचा जन्म कठीण आहे.

१८३ सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा ।
सचित्त परियोदपनं, एतं बुद्धान सासनं ॥५॥

पाप बिलकुल न करणें, पुण्याचा संचय करणें, आपल्या चित्ताला शुद्ध करणें, हाच बुद्धांचा उपदेश आहे.

जेतवन — आनंद (थेर)

१८४ खन्ती परमं तपो तितिक्खा,
निब्बाणं परमं वदन्ति बुद्धा ।
नहि पब्बजितो परूपघाती,
समणो होति परं विहेठयन्तो ॥६॥

सहनशीलता व क्षमाशीलता परम तप आहे, निर्वाण परम पद आहे असें बुद्ध सांगतात. दुसऱ्यांची हिंसा करणारा व दुसऱ्यांना त्रास देणारा प्रव्रजित खरा संन्यासी होऊं शकत नाही.

आनंद (थेर)

जेतवन

१८५ अनुपवादो अनुपघातो पातिमोक्खे* च संवरो ।
मत्तञ्ञुता च भत्तस्मिं पन्तञ्च सयनासनं
अधिचित्ते च आयोगो एतं बुद्धान सासनं ॥७॥

निंदा न करणें, घात न करणें, प्रातिमोक्षाच्या नियमांचें पालन करणें आहारांत युक्तता बाळगणें, झोपण्याकरितां एकान्तस्थान असणें, चित्ताच्या शुद्धींत तत्पर असणें हाच बुद्धांचा उपदेश आहे

उदास भिक्षु

जेतवन

१८६ न कहापणवस्सेन तित्ति कामेसु विज्जति ।
अप्पस्सादा दुखा कामा इति विञ्ञाय पण्डितो ॥८॥

१८७ अपि दिब्बेसु कामेसु रतिं सो नाधिगच्छति ।
तण्हक्खयरतो होति सम्मासम्बुद्धसावको ॥९॥

कार्षापणांचा (सोन्याचें नाणें) जरी वर्षाव झाला तरी मनुष्यांची कामतृष्णा तृप्त होऊं शकत नाही. सर्व भोग अल्पस्वाद व दुःखद आहेत हें जाणून पण्डित लोक देवतांच्या भोगांत सुद्धा रमत नाहीत; सम्यक् सम्बुद्धाचा श्रावक (शिष्य) तृष्णेचा नाश करण्यांत मग्न असतो.

अग्गिदत्त (ब्राह्मण)

जेतवन

१८८ बहुं वे सरणं यन्ति पब्बतानि वनानि च ।
आरामरुक्खचेत्यानि मनुस्सा भयतज्जिता ॥१०॥

१८९ नेतं खो सरणं खेमं नेतं सरणमुत्तमं ।
नेतं सरणमागम्म सब्बदुक्खा पमुच्चति ॥११॥

---

* प्रातिमोक्ष = भगवान बुद्धानें भिक्षुंकरितां घालून दिलेल्या नियमांच्या संग्रहास प्रातिमोक्ष म्हणतात.

भयभीत होऊन पुष्कळ माणसें पर्वत, वन, उद्यान, वृक्ष, चैत्य इत्यादींचा आश्रय घेतात. परंतु हे कल्याणकारी आश्रय नाहीत; हीं उत्तम शरण्यें नाहीत. ह्यांना शरण गेल्याने सर्व दुःखापासून मुक्ति होत नाही.

१९० यो च बुद्धं च धम्मं च संघं च सरणं गतो ।
चत्तारि अरियसच्चानि सम्मप्पञ्ञाय पस्सति ॥१२॥

१९१ दुक्खं दुक्खसमुप्पादं दुक्खस्स च अतिक्कमं ।
अरियञ्चट्ठङ्गिकं मग्गं दुक्खूपसमगामिनं ॥१३॥

१९२ एतं खो सरणं खेमं एतं सरणमुत्तमं ।
एतं सरणमागम्म सब्बदुक्खा पमुच्चति ॥१४॥

जो बुद्धाला, धर्माला व संघाला शरण गेला, जो चार आर्य-सत्य म्हणजे दुःख, दुःखाचें कारण, दुःखापासून मुक्ति व मुक्तिगामी आर्य अष्टांगिक मार्ग यांचा आपल्या प्रज्ञेने साक्षात्कार करितो तेव्हा हेंच त्याचें कल्याणकारी शरण्य आहे; हेंच उत्तम शरण-स्थान आहे. ह्यांचाच आश्रय घेतल्याने तो सर्व दुःखांपासून मुक्त होतो.

जेतवन — आनंद (थेर)

१९३ दुल्लभो पुरिसाजञ्ञो न सो सब्बत्थ जायति ।
यत्थ सो जायती धीरो तं कुलं सुखमेधति ॥१५॥

उत्तम पुरुष दुर्लभ असतो. तो सर्वत्र ठिकाणीं उत्पन्न होत नाही. ज्या कुळांत तो धीर पुरुष उत्पन्न होतो तें कुळ सुखी असतें.

जेतवन — पुष्कळ भिक्षु

१९४ सुखो बुद्धानं उप्पादो सुखा सद्धम्मदेसना ।
सुखा संघस्स सामग्गी समग्गानं तपो सुखो ॥१६॥

नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

बुद्धांचा जन्म सुखदायक असतो, त्याच्या धर्माचा उपदेश सुख-दायक असतो, संघांत चित्ताची एकाग्रता सुखदायक असते, समग्र लोकांनी प्रयत्नशील असणें सुखदायक असतें.

१९५ पूजारहे पूजयतो बुद्धे यदि व सावके ।
पपञ्चसमतिक्कन्ते तिण्णसोकपरिद्दवे ॥१७॥

१९६ ते तादिसे पूजयतो निब्बुते अकुतोभये ।
न सक्का पुञ्ञं संखातुं इमेत्तम्पि केनचि ॥१८॥

जे संसाराला अतिक्रमण करून पार गेले आहेत, जे शोकरहित व भयरहित आहेत, अशा पूजनीय पुरुषांची मग ती बुद्धाची असो अथवा त्याच्या शिष्यांची असो--जो पूजा करितो, अशा पूजेचे त्या मुक्त आणि निर्भय पुरुषांच्या पूजेचें-पुण्य मापन करतां येणें शक्य नाही. म्हणजे तें पुण्य 'इतकें आहे' असें म्हणतां येत नाही.

## १५ सुख-वर्ग

जातिकलहावर

शाक्य नगर

१९७ सुसुखं वत ! जीवाम वेरिनेसु अवेरिनो ।
वेरिनेसु मनुस्सेसु विहराम अवेरिनो ॥१॥

१९८ सुसुखं वत ! जीवाम आतुरेसु अनातुरा ।
आतुरेसु मनुस्सेसु विहराम अनातुरा ॥२॥

१९९ सुसुखं वत ! जीवाम उस्सुकेसु अनुस्सुका ।
उस्सुकेसु मनुस्सेसु विहराम अनुस्सुका ॥३॥

अहो, आम्ही वैऱ्यामध्ये अवैरी राहून सुखपूर्वक जगतों. अहो, आम्ही वैरी जनांमध्ये अवैरी राहून विहरतों. अहो, आम्ही भयभीत लोकांमध्ये भयरहित राहून सुखपूर्वक जगतों. अहो, आम्ही भयभीत

मनुष्यांमध्ये भयरहित विहरतों. अहो, आम्ही उत्सुक अथवा आसक्त लोकांमध्ये अनासक्त राहून सुखपूर्वक जगतो, अहो, आम्ही उत्सुक लोकांमध्ये अनासक्त विहरतों.

पंचसाला (ब्राह्मणग्राम) मगध . मार

२०० सुसुखं वत ! जीवाम येसं नो नत्थि किञ्चन ।
पीतिभक्खा भविस्साम देवा आभस्सरा यथा ॥४॥

ज्या आम्हांजवळ कांहीच नाही असे आम्ही आहो, किती सुखपूर्वक जगतों. आभास्वर देवाप्रमाणे आम्ही प्रीति-भक्ष्य होऊन राहूं.

जेतवन कोसलराज

२०१ जयं वेरं पसवति दुक्खं सेति पराजितो ।
उपसन्तो सुखं सेति हित्वा जयपराजयं ॥५॥

विजय द्वेष उत्पन्न करितो. पराजित मनुष्य दुःखाने झोप घेतो. जयपराजयाच्या पलीकडे गेलेला शान्त पुरुष सुखाने झोप घेतो.

जेतवन कोणी कुलकन्या

२०२ नत्थि रागसमो अग्गि नत्थि दोससमो कलि ।
नत्थि खन्धसमा* दुक्खा नत्थि सन्तिपरं सुखं ॥६॥

आसक्तीसारखा अग्नि नाही, द्वेषासारखा मळ नाही, स्कन्धासारखें दुःख नाही, शान्तीपेक्षा मोठें सुख नाही.

---

* रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञान हे पांच खन्ध अथवा स्कन्ध आहेत. रूप, स्कन्ध, पृथ्वी, आप, तेज आणि वायु यांनी बनलेलें आहे. रूप म्हणजे जड पदार्थ अथवा Matter विज्ञान म्हणजे मन अथवा Mind. विज्ञानांत वेदना, संज्ञा आणि संस्कार यांचा समावेश होतो. रूप आणि विज्ञान मिळूनच सर्व जग बनलें आहे. मन जोपर्यंत जगांत गुरफटलेलें असतें तोपर्यंत तें मलीन अतः दुःखी असतें. आणि म्हणूनच मनाला जगांत पडूं न देणें हाच खरा पुरुषार्थ आहे.

[illegible]
नुद सर्वाणि पापानि दर्प स्वस्तिकरो भव॥

एक उपासक

आलवी

२०३ जिघच्छा परमा रोगा, सङ्खारा परमा दुखा ।
एव ञत्वा यथाभूतं निब्बाणं परमं सुखं ॥७॥

भूक सर्वांत मोठा रोग आहे, संस्कार सर्वांत मोठें दुःख आहे, हें यथार्थपणे जाणून मनुष्यानें परम सुखदायक निर्वाणपद प्राप्त करावें.

पसेनदि कोसलराज

जेतवन

२०४ आरोग्यपरमा लाभा संतुट्ठी परमं धनं ।
विस्सासपरमा ञाति निब्बाणं परमं सुखं ॥८॥

आरोग्य सर्वांत श्रेष्ठ लाभ आहे. संतोष सर्वांत श्रेष्ठ धन आहे. विश्वास सर्वांत श्रेष्ठ मित्र आहे आणि निर्वाण सर्वांत श्रेष्ठ सुख आहे.

तिस्स (थेर)

वैशाली

२०५ पविवेकरसं पीत्वा रसं उपसमस्स च ।
निद्दरो होति निप्पापो धम्मपीतिरसं पिवं ॥९॥

एकान्ताचा आणि शान्तीचा रस पिऊन मनुष्य निर्भय होतो. आणि धर्माचा प्रेमरस पिऊन तो निष्पाप होतो.

सक्क (देवराज)

वेणुग्राम

२०६ साधु दस्सनमरियानं सन्निवासो सदा सुखो ।
अदस्सनेन बालानं निच्चमेव सुखी सिया ॥१०॥

२०७ बालसंगतिचारी हि दीघमद्धान सोचति ।
दुक्खो बालेहि संवासो अमित्तेनेव सब्बदा
धीरो च सुखसंवासो ञातीनं व समागमो ॥११॥

आर्यांचें दर्शन चांगलें असतें, त्याचा सहवास नेहमीच सुखदायी असतो, मूर्खांचें दर्शन न घेतल्यानेच मनुष्य नेहमी सुखी राहतो. मूर्खांच्या संगतीत राहणारा दीर्घकाळपर्यंत शोक करितो. मूर्खांचा सहवास

नेहमीच दुःखदायक असतो. धीरांचा सहवास बांधवांच्या सहवासाप्रमाणे सुखदायक असतो.

वेलुवगाम — सक्क (देवराज)

२०८ तस्मा हि धीरं च पञ्ञञ्च बहु-स्सुतं च
धोरय्हसीलं वतवन्तमरियं।
तं तादिसं सप्पुरिसं सुमेधं
भजेथ नक्खत्तपथं' व चन्दिमा ॥१२॥

आणि म्हणून मनुष्याने अशा धीर, ज्ञानी, बहुश्रुत, शीलवान्, व्रतसंपन्न आणि बुद्धिमान सत्पुरुषाचें अनुगमन करावें—जसें चंद्र नक्षत्र पथाचें करितो.

---

## १६ प्रिय-वर्ग

जेतवन — तीन भिक्षु

२०९ अयोगे युञ्जमत्तानं योगस्मिञ्च अयोजयं।
अत्थं हित्वा पियग्गाही पिहेत'त्तानुयोगिनं ॥१॥

परमार्थाला सोडून जो ह्या जगातील प्रिय वस्तूंना ग्रहण करितो, जो कुकर्मात मग्न राहून सुकर्म करीत नाही, अशा मनुष्याने आत्मोन्नतीस मग्न असणाऱ्या पुरुषाची स्पृहा करावी.

२१० मा पियेहि समागञ्छि अप्पियेहि कुदाचनं।
पियानं अदस्सनं दुक्खं अप्पियानञ्च दस्सनं ॥२॥

प्रियांचा संग करूं नये; तसेंच अप्रियांचा संग करूं नये. प्रियांचें अदर्शन दुःखद असतें तर अप्रियांचें दर्शन.

---

२११ तस्मा पियं न कयिराथ पियापायो हि पापको ।
गन्था तेसं न विज्जन्ति येसं नत्थि पियाप्पियं ॥३॥

आणि म्हणून प्रिय करूं नयेत; प्रियांचा वियोग दुःखद असतो. ज्या लोकांना प्रियाप्रिय नाहीत ते लोक बंधनांत नसतात.

जेतवन — कोणी कुटुंबी

२१२ पियतो जायते सोको पियतो जायते भयं ।
पियतो विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥४॥

प्रियांपासून शोक उत्पन्न होतो; प्रिय वस्तूपासून भय उत्पन्न होतें. जो प्रियांच्या बंधनांतून मुक्त आहे त्याला शोक नाही, तर भय कोठून ?

जेतवन — विशाखा (उपासिका)

२१३ पेमतो जायती सोको पेमतो जायते भयं ।
पेमतो विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥५॥

आसक्तीपासून शोक उत्पन्न होतो; आसक्तीपासून भय उत्पन्न होतें. जो आसक्तीच्या बंधनांतून मुक्त आहे त्याला शोक नाही, तर भय कोठून ?

वैशाली (कूटागार शाळा) — लिच्छवी लोक

२१४ रतिया जायते सोको रतिया जायते भयं ।
रतिया विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥६॥

रागापासून शोक उत्पन्न होतो; रागापासून भय उत्पन्न होतें. जो रागाच्या बंधनांतून मुक्त आहे त्याला शोक नाही, तर भय कोठून ?

जेतवन — अनित्थि गन्धकुमा

२१५ कामतो जायते सोको कामतो जायते भयं ।
कामतो विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥७॥

कामापासून शोक उत्पन्न होतो; कामापासून भय उत्पन्न होतें. जो कामाच्या बंधनांतून मुक्त आहे त्याला शोक नाही, तर भय कोठून !

जेतवन — कोणी ब्राह्मण

२१६ तण्हाय जायते सोको तण्हाय जायते भयं ।
तण्हाय विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥८॥

तृष्णेपासून शोक उत्पन्न होतो; तृष्णेपासून भय उत्पन्न होतें. जो तृष्णेच्या बंधनांतून मुक्त आहे त्याला शोक नाही, तर भय कोठून !

राजगृह (वेणुवन) — पांचशें बालक

२१७ सीलदस्सनसंपन्नं धम्मट्ठं सच्चवादिनं ।
अत्तनो कम्म कुब्बानं तं जनो कुरुते पियं ॥९॥

जो शील त्याचप्रमाणे विचारसंपन्न आहे, जो धर्मचारी आहे, सत्यवादी आहे, जो आपलें काम करणारा आहे अशा पुरुषावर लोक प्रेम करितात.

२१८ छन्दजातो अनक्खाते मनसा च फुटो सिया ।
कामेसु च अप्पटिबद्धचित्तो उद्धंसोतो'ति वुच्चति ॥१०॥

जो अकथ्याचा (निर्वाणाचा) अभिलाषी आहे व त्यातच ज्याचें मन लागलें आहे; कामवासना ज्याच्या चित्ताला अडवूं शकत नाहीत, अशाला ऊर्ध्वस्रोत म्हणतात.

ऋषिपतन — नन्दियपुत्त

२१९ चिरप्पवासिं पुरिसं दूरतो सोत्थिमागतं ।
ञातिमित्ता सुहज्जा च अभिनन्दन्ति आगतं ॥११॥

२२० तथेव कतपुञ्ञम्पि अस्मा लोका परं गतं ।
पुञ्ञानि पतिगण्हन्ति पियं ञातीव आगतं ॥१२॥

नुद सर्वाणि पापानि दर्प स्वस्तिकरो भव॥

पुष्कळ दिवस बाहेर लांब प्रवास केल्यानंतर सकुशल परत घरीं आलेल्या पुरुषाचे आप्त, मित्र आणि हितैषी स्वागत करितात; त्याच प्रमाणे ह्या लोकांतून परलोकांत गेलेल्या पुण्यात्म्याचें, आप्तेष्टाप्रमाणे त्यानें पुण्य स्वागत करितें.

---

## १७ क्रोध-वर्ग

रोहिणी

कपिलवस्तु (न्यग्रोधाराम)

२२१ कोधं जहे विप्पजहेय्य मानं
सञ्ञोजनं सब्बमतिक्कमेय्य ।
नाम-रूपस्मिं असज्जमानं
अकिञ्चनं नानुपतन्ति दुक्खा ॥१॥

क्रोध सोडावा, अभिमानाचा त्याग करावा, सर्व बन्धनांवर विजय मिळवावा. येणेंप्रमाणे जो नामरूपांत अनासक्त असतो असा अपरिग्रही दुःख भोगीत नाही.

कोणी भिक्षु

आलवी

२२२ यो वे उप्पतितं कोधं रथं भन्तं'व धारये ।
तमहं सारथिं ब्रूमि रस्मिग्गाहो इतरो जनो ॥२॥

वाढत्या क्रोधाला जो बहकलेल्या रथाप्रमाणे थांबवून धरितो त्यालाच मी खरा सारथी म्हणतों; बाकीचे नुसते लगाम धरणारेच आहेत.

उत्तरा (उपासिका)

राजगृह

२२३ अक्कोधेन जिने कोधं असाधुं साधुना जिने ।
जिने कदरियं दानेन सच्चेन अलिकवादिनं ॥३॥

अक्रोधाने क्रोधाला जिंकावें; असाधुला साधुत्वाने जिंकावें; कृप-णाला दानाने जिंकावें व खोटें बोलणाराला सत्याने जिंकावें.

जेतवन महामोग्गल्लान (थेर)

२२४ सच्चं भणे न कुज्झेय्य, दज्जा'प्पस्मिम्पि याचितो ।
एतेहि तीहि ठानेहि गच्छे देवान सन्तिके ॥४॥

खरें बोलावें, रागावूं नये, मागितल्यानंतर थोडें तरी द्यावें. ह्या तीन गोष्टी पाळल्या तर मनुष्य देवाजवळ जातो.

साकेत (अयोध्या) ब्राह्मण

२२५ अहिंसका ये मुनयो निच्चं कायेन संवुता ।
ते यन्ति अच्चुतं ठानं यत्थ गन्त्वा न सोचरे ॥५॥

जे हिंसा करीत नाहीत, जे नित्य आपल्या शरीराला ताब्यांत ठेवतात असे मुनि लोक अशा अच्युत पदाला जातात जे प्राप्त केल्या-नंतर त्यांना शोक नसतो.

राजगृह (गृध्रकूट) राजगृह श्रेष्ठीचा मुलगा

२२६ सदा जागरमानानं अहोरत्तानुसिक्खिनं ।
निब्बाणं अधिमुत्तानं अत्थं गच्छन्ति आसवा ॥६॥

निर्वाणच ज्यांचें उद्दिष्ट आहे; जे सदा जागरणशील असतात, जे रात्रंदिवस योगाभ्यासांत मग्न असतात अशा पुरुषांचे सर्व आश्रव अथवा चित्त–मल नष्ट होतात.

जेतवन अतुल (उपासक)

२२७ पोराणमेतं अतुल नेतं अज्जतनामिव ।
निन्दन्ति तुण्हीमासीनं निन्दन्ति बहुभाणिनं ।
मितभाणिनम्पि निन्दन्ति नत्थि लोके अनिन्दितो ॥७॥

२२८ न चाहु न च भविस्सति न चेतरहि विज्जति ।
एकन्तं निन्दितो पोसो, एकन्तं वा पसंसितो ॥८॥

हे अतुल ! ही अनादि गोष्ट आहे; आजकालची नाही. जो स्तब्ध असतो त्याची लोक निंदा करितात; पुष्कळ बोलणारा तसेंच मितभाषी यांची सुद्धा निन्दा होते. ज्याची निंदा होत नाही असा जगांत कोणीच नाही. सर्वथा ज्याची निन्दाच होते किंवा सर्वथा ज्याची प्रसंशाच होते असा मनुष्य जगांत झाला नाही, होणार नाही अथवा विद्यमान नाही.

अतुल उपासक

जेतवन

२२९ यञ्चे विञ्ञू पसंसन्ति अनुविच्च सुवे सुवे ।
अच्छिद्दवुत्तिं मेधाविं पञ्ञासीलसमाहितं ॥९॥

२३० नेक्खं जम्बोनदस्सेव को तं निन्दितुमरहति ।
देवापि तं पसंसन्ति ब्रह्मुणापि पसंसितो ॥१०॥

ज्या दोषरहित, मेधावी, प्रज्ञा व शीलसंपन्न पुरुषाची विज्ञ लोक विवेकाने वारंवार प्रसंशा करितात अशा सोन्याच्या खणखणीत नाण्याप्रमाणे असणाऱ्या पुरुषाची निंदा कोण बरें करूं शकतो ? देव सुद्धा अशाची प्रसंशा करितात व ब्रह्मदेव देखील.

वज्जिय भिक्षु

वेणुवन

२३१ कायप्पकोपं रक्खेय्य कायेन संवुतो सिया ।
कायदुच्चरितं हित्वा कायेन सुचरितं चरे ॥११॥

२३२ वचीपकोपं रक्खेय्य वाचाय संवुतो सिया ।
वची दुच्चरितं हित्वा वाचाय सुचरितं चरे ॥१२॥

२३३ मनोप्पकोपं रक्खेय्य मनसा संवुतो सिया ।
मनोदुच्चरितं हित्वा मनसा सुचरितं चरे ॥१३॥

२३४ कायेन संवुता धीरा अथो वाचाय संवुता ।
मनसा संवुता धीरा ते वे सुपरिसंवुता ॥१४॥

( मनुष्याने ) शारीरिक दुराचरणापासून आपलें रक्षण करावें; शरीराने संयत राहावें, शारीरिक दुराचाराना सोडून शारीरिक सदा-

चोरांचें आचरण करावें. (मनुष्यानें) वाचिक दुराचरणापासून आपलें रक्षण करावें; वाचेनें संयत रहावें; वाचसिक दुराचारांना सोडून वाचसिक सदाचारांचें आचरण करावें. (मनुष्यानें) मानसिक दुराचरणापासून आपलें रक्षण करावें; मनानें संयत राहावें; मानसिक दुराचारांना सोडून मानसिक सदाचारांचें आचरण करावें. धीर पुरुष शरीरानें, वाचेनें आणि मनानें संयत असतात; तेच खरे संयत आहेत.

---

## १८ मल-वर्ग

जेतवन — गोघातक पुत्र

२३५ *पण्डुपलासो'व दानिसि, यमपुरिसापि च तं उपट्ठिता ।*
*उय्योगमुखे च तिट्ठसि पाथेय्यम्पि च ते न विज्जति ॥१॥*

२३६ *सो करोहि दीपमत्तनो खिप्पं वायम पण्डितो भव ।*
*निद्धन्तमलो अनङ्गणो दिब्बं अरियभूमिमेहिसि ॥२॥*

तूं पिकलेलें पान आहेस; यमदूत तुझ्याजवळ येऊन उभे आहेत; तूं आता प्रयाण करणार आहेस; आणि शिदोरी तर तुझ्याजवळ मुळीच नाही आणि म्हणून तूं आपल्या स्वतःला दीप बनव. तातडीनें उद्योग करून पंडित हो; मळ धुवून टाकल्यावर आणि दोषरहित झाल्यावर तूं आर्यांच्या दिव्य पदाला पोचशील.

जेतवन — गोघातक पुत्र

२३७ *उपनीतवयो च दानिसि सम्पयातोसि यमस्स सन्तिके ।*
*वासोपि च ते नत्थि अन्तरा पाथेय्यम्पि च ते न विज्जति ॥३॥*

२३८ *सो करोहि दीपमत्तनो खिप्पं वायम पण्डितो भव ।*
*निद्धन्तमलो अनङ्गणो न पुन जातिजरं उपेहिसि ॥४॥*

तुझें आयुष्य संपलें आहे; तूं यमाजवळ पोचलेला आहेस, वाटेत तुला विसाव्याला जागा सुद्धा नाही व आवश्यक शिदोरीहि पण तुझ्याजवळ नाही. म्हणून तूं आपल्या स्वतःला द्वीप बनव, तातडतोब उद्योग करून पंडित हो; मळ धुवून टाकल्यावर आणि दोष-रहित झाल्यावर तूं जन्म आणि जरा यांच्या तावडीतून सुटशील.

जेतवन — कोणी ब्राह्मण

२३९ अनुपुब्बेन मेधावी थोकथोकं खणे खणे ।
कम्मारो रजतस्सेव निद्धमे मलमत्तनो ॥५॥

सोनार ज्याप्रमाणे चांदीचा मळ क्रमाक्रमाने प्रत्येक क्षणाला थोडा थोडा जाळून साफ करितो, त्याप्रमाणे बुद्धिमान पुरुषाने आपला मळ हळू हळू काढून टाकावा.

जेतवन — तिस्स थेर

२४० अयसा' व मलं समुट्ठितं तदुट्ठाय तमेव खादति ।
एवं अतिधोनचारिनं सानि कम्मानि नयन्ति दुग्गतिं ॥६॥

लोखंडाचा जंग लोखंडापासून उत्पन्न होऊन जसा त्यालाच खातो; त्याचप्रमाणे दुराचारी माणसाचें स्वतःचें कर्मच त्याला दुर्गतीला नेतें.

जेतवन — लाल उदायी थेर

२४१ असज्झायमला मन्ता अनुट्ठानमला घरा ।
मलं वण्णस्स कोसज्जं पमादो रक्खतो मलं ॥७॥

उजळणी न करणें हा मंत्राचा मळ आहे, झाडसूड न करणें हा घराचा मळ आहे; आळस हा सौंदर्याचा मळ आहे आणि प्रमाद अथवा असावधानता हा रक्षकाचा मळ आहे.

राजगृह (वेणुवन) — कोणी कुलपुत्र

२४२ मलित्थिया दुच्चरितं मच्छेरं ददतो मलं ।
मला वे पापका धम्मा अस्मिं लोके परम्हि च ॥८॥

स्त्रीचा मळ दुराचार आहे; क्षुद्रता हा दात्याचा मळ आहे; पाप हा इह लोकाप्रमाणे परलोकाचा मळ आहे.

२४३ ततो मला मलतरं अविज्जा* परमं मलं ।
एतं मलं पहत्वान निम्मला होथ भिक्खवो ॥९॥

हे भिक्षूंनो, त्यापेक्षाहि मोठा अविद्या परम मळ आहे; ह्या मळाला काढून टाकून निर्मळ बना.

बेतवन (चुल्ल) सारी

२४४ सुजीवं अहिरीकेन काकसूरेन धंसिना ।
पक्खन्दिना पगब्भेन संकिलिट्ठेन जीवितं ॥१०॥

निर्लज्ज, कावळ्यासारखे शूर, विघातक, आचारहीन, गर्विष्ठ आणि भ्रष्ट जीवन फार सोपे असते.

२४५ हिरीमता च दुज्जीवं निच्चं सुचिगवेसिना ।
अलीनेनऽप्पगब्भेन सुद्धाजीवेन पस्सता ॥११॥

* अविज्जा = अविद्या. प्रतित्य-समुत्पन्न म्हणजे कारण-कार्य-भाव. प्रतित्य म्हणजे कारण आणि समुत्पन्न म्हणजे उत्पन्न झालेले म्हणजे सकारण उत्पन्न झालेलें. त्यामुळे दुःख उद्भवतें तें कारणच जर नष्ट झालें तर दुःखच होणार नाही. ह्या दृष्टीने अविद्या ही सर्व दुःखाचें मूळ कारण आहे असें भगवान बुद्धांचें म्हणणें आहे. अविद्या नष्ट झाली म्हणजे दुःख नष्ट होते. अविद्येपासून संस्कार उत्पन्न होतात; संस्कारापासून विज्ञान; विज्ञानापासून नामरूप; नामरूपापासून षडायतन; षडायतनापासून स्पर्श; स्पर्शापासून वेदना; वेदनेपासून तृष्णा; तृष्णेपासून उपादान; उपादानापासून भव; भवापासून जन्म आणि जन्मापासून जरा, व्याधि, दुःख आणि मरण उत्पन्न होतात. अविद्याच दुःखाचें मूळ कारण असल्यामुळे ती नष्ट करण्यावरच बुद्ध जोर देतो. आणि म्हणून अविद्येला सर्वांत मोठा मळ म्हटलें आहे.

नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

लज्जाशील, नेहमी पवित्रतेकडे लक्ष ठेवून वागणारे, दक्ष, मित-भाषी, शुद्ध आणि ज्ञानी जीवन कठीण असतें.

जेतवन पाचशें उपासक

२४६ यो पाणमतिपातेति मुसावादञ्च भासति ।
लोके अदिन्नं आदियति परदारञ्च गच्छति ॥१२॥

२४७ सुरामेरयपानञ्च यो नरो अनुयुञ्जति ।
इधेवमेसो लोकस्मिं मूलं खनति अत्तनो ॥१३॥

२४८ एवं भो पुरिस ! जानाहि पापधम्मा असञ्ञता ।
मा तं लोभो अधम्मो च चिरं दुक्खाय रन्धयुं ॥१४॥

जो हिंसा करितो, खोटें बोलतो, चोरी करितो, परस्त्रीगमन करितो, मद्यपान करितो तो ह्या जगात आपलेंच मूळ खणतो.

हे मनुजा ! संयमहीन दुष्कर्म असेंच असतात, हें ओळख; तुला लोभ आणि अधर्म चिरकालपर्यंत दुःखांत न लोटोत.

जेतवन तिस्स (बालक)

२४९ ददन्ति वे यथासद्धं यथापसादनं जनो ।
तत्थ यो मंकु भवति परेसं पानभोजने ।
न सो दिवा वा रत्तिं वा समाधिं अधिगच्छति ॥१५॥

२५० यस्स च तं समुच्छिन्नं मूलघच्चं समूहतं
स वे दिवा वा रत्तिं वा समाधिं अधिगच्छति ॥१६॥

लोक आपल्या श्रद्धेने आणि भक्तीने दान देतात; दुसऱ्याचें खाणेंपिणें पाहून जो खिन्न होतो अशाला दिवसा किंवा रात्रीं कधीच समाधान मिळत नाही. ज्याची असली मनोवृत्ति नष्ट झाली आहे अशाच पुरुषाला दिवसा आणि रात्रीं समाधान लाभतें.

जेतवन पाच उपासक

२५१ नत्थि रागसमो अग्गि नत्थि दोससमो गहो ।
नत्थि मोहसमं जालं नत्थि तण्हासमा नदी ॥१७॥

आसक्तीसारखी आग नाही, द्वेषासारखी पकड नाही, मोहा-सारखें जाळें नाही आणि तृष्णेसारखी नदी नाही.

महिनगर मेण्डक (श्रेष्ठी)

२५२ सुदस्सं वज्जमञ्ञेसं अत्तनो पन दुद्दसं
परेसं हि सो वज्जानि ओपुणाति यथाभुसं ।
अत्तनो पन छादेति कलिं' व कितवा सठो ॥१८॥

दुसऱ्याचे दोष पाहणें सोपें आहे, परंतु आपले दोष पाहणें कठीण आहे; मनुष्य दुसऱ्याचे दोष भुसाप्रमाणे उडवित जातो, परंतु आपले स्वतःचे दोष तो तसेच झाकतो, जसें शठ जुगारी हारीला डाव.

जेतवन उज्झानसञ्ञी (थेर)

२५३ परवज्जानुपस्सिस्स निच्चं उज्झानसञ्ञिनो ।
आसवा तस्स वड्ढन्ति आरा सो आसवक्खया ॥१९॥

जो दुसऱ्यांचे दोष पाहतो व नेहमी दुसऱ्यावर टीका करितो अशा मनुष्याचे चित्तमल वाढतात; असला मनुष्य चित्तमलाच्या क्षया-पासून दूर असतो.

कुशीनगर सुभद्द परिव्राजक

२५४ आकासे च पदं नत्थि समणो नत्थि बाहिरे* ।
पपञ्चाभिरता पजा निप्पपञ्चा तथागता ॥२०॥

---

* श्रमण बाहेर नसतो याचा अर्थ काय ? पुष्कळदा लोकांचा असा समज असतो की श्रमण किंवा संन्यासी होण्याकरिता घरदार सोडून अरण्यांत जावें लागतें. वास्तविक अनासक्त वृत्ति बाणणें म्हणजेच खरा संन्यास होय. आणि म्हणून तुकाराम महाराज म्हणतात "नका दंतकथा येथें सांगों कोणी" बुद्धाचें सुद्धा हेंच म्हणणें आहे. श्लोक १४२ पहा. बाह्य रूपाने संन्यासी होत नसतो. "अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ। त्याचे गळां माळ असो नसो।"—संत तुकाराम

नुद सर्वाणि पापानि दर्भे स्वस्तिकरो भव॥

२९५ आकासे च पदं नत्थि समणो नत्थि बाहिरे।
सङ्खारा सस्सता नत्थि, नत्थि बुद्धानमिञ्जितं ॥२१॥

आकाशाला वाट नाही. श्रमण (जगाचे) बाहेर नसतो. लोक प्रपंचांत आसक्त असतात परंतु तथागत, जगांत अनासक्त असतात. आकाशाला वाट नाही; श्रमण (जगाचे) बाहेर नसतो. संस्कार नित्य नसतात. बुद्धांत चंचलता नसते.

## १९ धर्मस्थ-वर्ग

विनिच्छयमहामत्त

जेतवन

२५६ न तेन होति धम्मट्ठो येनत्थं सहसा नये।
यो च अत्थं अनत्थं च उभो निच्छेय्य पण्डितो ॥१॥

२५७ असाहसेन धम्मेन समेन नयती परे।
धम्मस्स गुत्तो मेधावी धम्मट्ठो'ति पवुच्चति ॥२॥

सारासार विचार न करितो मनुष्य न्याय देतो, त्यामुळे तो न्यायाधीश होत नाही. जो पंडित खरें आणि खोटें याची निवड करून विचारपूर्वक पक्षपातरहित धर्माने न्याय देतो तोच धर्मरक्षक असून त्यास न्यायाधीश म्हणविला जातो.

षड्वर्गीय (भिक्षु)

जेतवन

२५८ न तेन पण्डितो होति यावता बहु भासति।
खेमी अवेरी अभयो पण्डितो'ति पवुच्चति ॥३॥

पुष्कळ बोलण्याने पंडित होत नाही. जो क्षेमवान, अवैरी आणि अभय आहे तोच पंडित म्हणविला जातो.

जेतवन | एकुदान (थेर)

२५९. न तावता धम्मधरो यावता बहु भासति ।
यो च अप्पम्पि सुत्वान धम्मं कायेन पस्सति ।
स वे धम्मधरो होति यो धम्मं नप्पमज्जति ॥४॥

तो पुष्कळ बोलतो म्हणून तो धर्मधर होत नाही. जो थोडेंच ऐकून तें आपल्या आचरणात आणतो व धर्माची अवहेलना करीत नाही तोच धर्मधर होय.

जेतवन | लकुण्टक भद्दिय (थेर)

२६० न तेन थेरो होति येनस्स पलितं सिरो ।
परिपक्को वयो तस्स मोघजिण्णो'ति वुच्चति ॥५॥

शिर पिकलें म्हणून मनुष्य स्थविर होत नाही. त्याचें वय पाढलें पण तो व्यर्थच वृद्ध म्हणविला जाईल.

२६१ यम्हि सच्चञ्च धम्मो च अहिंसा सञ्ञमो दमो ।
स वे वन्तमलो धीरो थेरो 'ति पवुच्चति ॥६॥

ज्यांत सत्य, धर्म, अहिंसा, संयम व दम आहेत तोच विगतमल धीर थेर म्हटला जातो.

जेतवन | किती तरी भिक्षु

२६२ न वाक्करणमत्तेन वण्णपोक्खरताय वा ।
साधुरूपो नरो होति इस्सुकी मच्छरी सठो ॥७॥

२६३ यस्स चेतं समुच्छिन्नं मूलघच्चं समूहतं ।
स वन्तदोसो मेधावी साधुरूपो' ति वुच्चति ॥८॥

ईर्ष्या आणि मात्सर्ययुक्त शठ पुरुष आपल्या वाणीने किंवा सौंदर्याने चांगला होत नाही. ज्याची ईर्ष्या आणि मात्सर्य उच्छिन्न झाले आहेत, समूळ नष्ट झाले आहेत, तोच द्वेषरहित मेधावी चांगला म्हटला जातो.

हत्थक भिक्षु

जेतवन

२६४ न मुण्डकेन समणो अब्बतो अलिकं भणं ।
इच्छालाभसमापन्नो समणो किं भविस्सति ॥९॥

२६५ यो च समेति पापानि अणुं थूलानि सब्बसो ।
समितत्ता हि पापानं समणो'ति पवुच्चति ॥१०॥

जो व्रतरहित, मिथ्याभाषी आहे, तो केवळ मुण्डनाने श्रमण होत नाही. इच्छा आणि लाभाने भरलेला पुरुष श्रमण कसा होईल? जो लहानमोठ्या पापांना संपूर्णपणे शमवितो, तो पापें शमवितो म्हणून श्रमण म्हटला जातो.

कोणी ब्राम्हण

जेतवन

२६६ न तेन भिक्खु (सो) होति यावता भिक्खते परे ।
विस्सं धम्मं समादाय भिक्खु होति न तावता ॥११॥

दुसऱ्याजवळ भिक्षा मागतो म्हणून तो भिक्षु होत नाही. जोपर्यंत तो विश्वातील वाम अवडंबराचें अवलंबन करितो तोपर्यंत तो भिक्षु होत नाही.

२६७ यो'ध पुञ्ञञ्च पापञ्च बाहित्वा ब्रम्हचरियवा ।
सङ्खाय लोके चरति स वे भिक्खू'ति वुच्चति ॥१२॥

पाप-पुण्यांना झाडून जो सदा ब्रम्हचारी असतो व जगात विवेकयुक्त वावरतो तोच खरा भिक्षु होय.

तीर्थिक

जेतवन

२६८ न मोनेन मुनी होती मुल्हरूपो अविद्दसु ।
यो च तुलं'व पग्गय्ह वरमादाय पण्डितो ॥१३॥

२६९ पापानि परिवज्जेति स मुनितेन सो मुनी ।
यो मुनाति उभो लोके मुनी तेन पवुच्चति ॥१४॥

केवळ मौन धारण केल्याने एखादा अविद्वान मूर्ख मुनी होत नाही. जो पंडित जणु काय आपल्या हातांत श्रेष्ठ तराजू धरून पापाचा त्याग करितो व चांगलें ग्रहण करितो, तोच मुनी होय. जो दोन्ही लोकांचा आपल्या प्रज्ञेने विचार करितो तो त्यामुळे मुनी म्हटला जातो.

जेतवन — अरिय बालिसिक

२७० न तेन अरियो होति येन पाणानि हिंसति ।
अहिंसा सब्बपाणानं अरियो'ति पवुच्चति ॥१५॥

प्राण्यांची हिंसा केल्याने आर्य होत नाही. प्राणिमात्रांची हिंसा न करणारा आर्य म्हटला जातो.

जेतवन — पुष्कळसे भिक्षु

२७१ न सीलब्बतमत्तेन बाहुसच्चेन वा पुन ।
अथवा समाधिलाभेन विवित्तसयनेन वा ॥१६॥

२७२ फुसामि नेक्खम्मसुखं अपुथुज्जनसेवितं ।
भिक्खु ! विस्सासमापादि अप्पत्तो आसवक्खयं ॥१७॥

केवळ शील आणि व्रत यांच्या आचरणाने किंवा केवळ बहुश्रुतत्वाने किंवा समाधिलाभाने किंवा एकान्तवासाने मी नैष्कर्म्य सुखाचा —जें सुख संसारांतील लोकांना मिळूं शकत नाही— लाभ घेत नाही. भिक्षुनो, जोपर्यंत आश्रवांचा क्षय होत नाही तोपर्यंत स्वस्थ बसूं नका.

---

## २० मार्ग-वर्ग

जेतवन — पांचशें भिक्षु

२७३ मग्गानट्ठङ्गिको सेट्ठो सच्चानं चतुरो पदा ।
विरागो सेट्ठो धम्मानं द्विपदानञ्च चक्खुमा ॥१॥

२७४ एसो'व मग्गो नत्थ'ञ्ञो दस्सनस्स विसुद्धिया ।
एतं हि तुम्हे पटिपज्जथ मारस्सेतं पमोहनं ॥२॥

---

मुद सर्वाणि पापानि दर्भ व्यांतिकरो भव॥

मार्गांत श्रेष्ठ अष्टांगिक मार्ग आहे, सत्यांत चार आर्य सत्यें श्रेष्ठ आहेत, धर्मांत वैराग्य श्रेष्ठ आहे, द्विपदांमध्ये डोळस श्रेष्ठ आहे. दृष्टि स्वच्छ होण्याकरिता हाच एक मार्ग आहे, दुसरा नाही. भिक्षुंनो, ह्यावरच तुम्ही आरूढ व्हा; माराला हाच जिंकू शकतो.

२७५ एतं हि तुम्हे पटिपन्ना दुक्खस्सन्तं करिस्सथ ।
अक्खातो वे मया मग्गो अञ्ञाय सल्लसन्थनं ॥३॥

२७६ तुम्हेहि किच्चं आतप्पं अक्खातारो तथागता ।
पटिपन्ना पमोक्खन्ति झायिनो मारबन्धना ॥४॥

ह्या मार्गावर आरूढ होऊन तुम्ही दुःखाचा अंत करूं शकाल. दुःखाचे उगम-स्थान स्वतः जाणूनच ह्या मार्गाचा मी तुम्हास उपदेश करीत आहे. तथागत (बुद्ध) हे केवळ मार्गदर्शक असतात. प्रयत्न तर तुम्हालाच करावा लागणार आहे. ध्यानाभ्यासी लोक ह्या मार्गावर आरूढ होऊन माराच्या बंधनांतून मुक्त होतात.

२७७ सब्बे सङ्खारा अनिच्चा 'ति यदा पञ्ञाय पस्सति ।
अथ निब्बिन्दति दुक्खे, एस मग्गो विसुद्धिया ॥५॥

सर्वच वस्तु अनित्य आहेत, ह्या गोष्टीचा मनुष्य जेव्हा आपल्या प्रज्ञेने अनुभव घेतो तेव्हा दुःख त्याला विचलित करूं शकत नाही. विशुद्धीचा हाच मार्ग आहे.

पांचशें भिक्षु

जेतवन

२७८ सब्बे सङ्खारा दुक्खा' ति यदा पञ्ञाय पस्सति ।
अथ निब्बिन्दति दुक्खे, एस मग्गो विसुद्धिया ॥६॥

सर्वच वस्तु दुःखाचे कारण आहेत ही गोष्ट जेव्हा मनुष्य आपल्या प्रज्ञेने ओळखतो तेव्हा त्याला दुःख विचलित करूं शकत नाही. विशुद्धीचा हाच मार्ग आहे.

२७९ सब्बे धम्मा अनत्ता'ति यदा पञ्ञाय पस्सति ।
अथ निब्बिन्दति दुक्खे एस मग्गो विसुद्धिया ॥७॥

सर्वच धर्म अथवा चित्त-प्रवृत्ति अनात्म अथवा अनित्य आहेत, हें जेव्हा मनुष्य आपल्या प्रज्ञेने ओळखतो तेव्हा त्याला दुःख विचलित करूं शकत नाही. हाच विशुद्धीचा मार्ग आहे.

जेतवन — तिस्स (थेर)

२८० उट्ठानकालम्हि अनुट्ठहानो
युवा बली आलसियं उपेतो ।
संसन्नसङ्कप्पमनो कुसीतो
पञ्ञाय मग्गं अलसो न विन्दति ॥८॥

तरुण आणि सशक्त असूनहि जो पुरुष आळसामुळे उद्योगाचे वेळीं उद्योग करीत नाही असा आकांक्षाहीन, निष्क्रिय व आळशी पुरुष प्रज्ञेचा मार्ग जाणूं शकत नाही.

राजगृह (वेणुवन) — (सूकर-प्रेत)

२८१ वाचानुरक्खी मनसा सुसंवुतो
कायेन च अकुसलं न कयिरा ।
एते तयो कम्मपथे विसोधये ।
आराधये मग्गमिसिप्पवेदितं ॥९॥

वाणीवर संयम ठेवावा, मनावर संयम ठेवावा आणि शरीराने कांहीहि पाप करूं नये. ह्या तिन्ही कर्म-पथांना शुद्ध करावें आणि ऋषिप्रणीत मार्गाचें अनुसरण करावें.

जेतवन — पोठिल (थेर)

२८२ योगा वे जायती भूरि अयोगा भूरिसङ्खयो ।
एतं द्वेधापथं ञत्वा भवाय विभवाय च ।
तथ'त्तानं निवेसेय्य यथा भूरि पवड्ढति ॥१०॥

---

योगाने अथवा अभ्यासाने प्रज्ञा उत्पन्न होते; आणि त्याच्या अभावाने प्रज्ञेचा क्षय होतो. उन्नति आणि विनाशाचे हे दोन भिन्न मार्ग आहेत हें जाणून मनुष्याने आपली प्रज्ञा वाढविण्याकडे प्रयत्नशील असावें.

जेतवन कोणी वृद्ध भिक्षु

२८३ वनं छिन्दथ मा रुक्खं वनतो जायती भयं ।
छेत्वा वनञ्च वनथञ्च निब्बना होथ भिक्खवो ॥११॥

२८४ यावं हि वनथो न छिज्जति अनुमत्तोपि नरस्स नारिसु ।
पटिबद्धमनो नु ताव सो वच्छो खीरपको 'व मातरि ॥१२॥

वनाला कापा (नुसतें) वृक्षाला नाही, वनामुळे भय उत्पन्न होतें. भिक्षुंनो, वन आणि वनांतील झाडांना कापून निर्वाण प्राप्त करा. मनुष्यांस स्त्रीविषयी कामवासनेचा जर थोडाहि अंश असला तर तो पुरुष बन्धनांत असतो—जसें दूध पिणारें वासरू आपल्या आईच्या.

जेतवन सुवर्णकार (थेर)

२८५ उच्छिन्द सिनेहमत्तनो कुमुदं सारदिकं 'व पाणिना ।
सन्तिमग्गमेव ब्रूहय निब्बानं सुगतेन देसितं ॥१३॥

शरद् ऋतूंतील कमल जसें हाताने तोडावें तसेंच आत्मस्नेह तोडून टाका, व बुद्ध-द्वारा उपदिष्ट निर्वाणाला नेणाऱ्या शान्ति मार्गाचा आश्रय घ्या.

जेतवन महाधनि (वणिक)

२८६ इध वस्सं वसिस्सामि इध हेमन्तगिम्हसु ।
इति बालो विचिन्तेति अन्तरायं न बुज्झति ॥१४॥

पावसाळ्यांत येथे राहीन, हिवाळ्यांत आणि उन्हाळ्यांत येथे राहीन, असला विचार मूर्ख करितो, पण (आंतील) विघ्नांना तो विचारच करीत नाही.

जेतवन — किसा गोतमी (थेरी)

२८७ तं पुत्तपसुसम्मत्तं ब्यासत्तमनसं नरं ।
सुत्तं गामं महोघो 'व मच्चू आदाय गच्छति ॥१५॥

झोपलेल्या गावाला जसा महापूर घेऊन जातो, तसेंच पुत्र आणि पशूंत आसक्त असलेल्या मनुष्याला मृत्यु घेऊन जातो.

जेतवन — पटाचारा

२८८ न सन्ति पुत्ता ताणाय न पिता नापि बन्धवा ।
अन्तकेनाधिपन्नस्स नत्थि ञातिसु ताणता ॥१६॥

जेव्हा मृत्यु घेतो तेव्हा आप्तेष्ट रक्षण करूं शकत नाहीत, पुत्र रक्षण करूं शकत नाही, न बाप, न बांधव.

२८९ एतमत्थवसं ञत्वा पण्डितो सीलसंवुतो ।
निब्बाण-गमनं मग्गं खिप्पमेव विसोधये ॥१७॥

हें यथार्थ जाणून पंडिताने शीलवान् होऊन, निर्वाण-गामी मार्गाचें तात्काळ अवलंबन करावें.

---

## २१ प्रकीर्ण-वर्ग

राजगृह (वेणुवन) — गंगावरोहण

२९० मत्तासुखपरिच्चागा पस्से चे विपुलं सुखं ।
चजे मत्तासुखं धीरो सम्पस्सं विपुलं सुखं ॥१॥

नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

थोडया सुखाच्या त्यागाने जर पुष्कळ सुखाची प्राप्ति होते, तर पुष्कळ सुख लक्षात घेवून बुद्धिमान पुरुषाने थोडया सुखाचा त्याग करावा.

जेतवन कोणी पुरुष

२९१ परदुक्खूपदानेन यो अत्तनो सुखमिच्छति ।
वेरसंसग्गसंसट्ठो वेरा सो न परिमुच्चति ॥२॥

दुसऱ्याना दुःख देवून जो आपण सुखी होऊं पाहतो, तो वैराने परिपूर्ण पुरुष वैरांतून मुक्त होत नाही.

भद्दिय नगर (जातियावन) भद्दिय (भिक्षु)

२९२ यं हि किच्चं तदपविद्धं अकिच्चं पन करियति ।
उन्नलानं पमत्तानं तेसं वड्ढन्ति आसवा ॥३॥

२९३ येसञ्च सुसमारद्धा निच्चं कायगता सति ।
अकिच्चन्ते न सेवन्ति किच्चे सातच्चकारिनो ।
सतानं सम्पजानानं अत्थं गच्छन्ति आसवा ॥४॥

जें करावयाचें आहे तें जो करीत नाही व जें करावयाचे नाही ते जो करितो अशा प्रमत्त मलिन पुरुषाचे चित्तमल वाढतात. काया क्षणभंगुर असून तींत मलीनता आदि दोष असतात, ही दृष्टि ज्यांच्या नेहमीं समोर असते असे कर्तव्यतत्पर पुरुष जें करावयाचें नसतें तें करीत नाहीत. अशा स्मृतिमान् व जागृत पुरुषाचें चित्तमल नष्ट होतात.

जेतवन लकुण्टक भद्दिय (थेर).

२९४ मातरं पितरं हन्त्वा* राजानो द्वे च खत्तिये ।
रट्ठं सानुचरं हन्त्वा अनिघो याति ब्राह्मणो ॥६॥

---

* तुकाराम महाराज नेमकी हीच उपमा देतात—
'माय बाप दोन्ही जीवेंची मारावे.' थोरांच्या विचारांत कसें साम्य असतें हें ह्यावरून स्पष्ट होतें.

माता (तृष्णा), पिता (अहंकार), दोन क्षत्रिय राजे (शाश्व
आणि उच्छेद दृष्टि) आणि राज्यांतील त्यांचे अनुचर (जगांतील
आसक्ति) यांना मारून ब्राह्मण निष्पाप होतो, याचा सरळ अर्थ हा
मनुष्य जेव्हा तृष्णेला व अहंकाराला जिंकतो तेव्हा तो अर्हत अथ
निर्वाण पदाला पोचतो.

२९५ मातरं पितरं हन्त्वा राजानो द्वे च सोत्थिये ।
वेय्यग्घपञ्चमं हन्त्वा अनिघो याति ब्राह्मणो ॥६॥

माता (तृष्णा), पिता (अहंकार), दोन श्रोत्रिय राजे (शाश्व
आणि उच्छेद दृष्टि) आणि पाचवा व्याघ्र (संशय) यांना मारून ब्राह्म
निष्पाप होतो.

राजगृह (वेणुवन) (दारुसाकटिकपुत्र

२९६ सुप्पबुद्धं पबुज्झन्ति सदा गोतमसावका ।
येसं दिवा च रत्तो च निच्चं बुद्धगता सति ॥७॥

गौतमाचे शिष्य रात्रंदिवस सदैव भगवान बुद्धाच्या गुणस्मरणा
तल्लीन असतात.

२९७ सुप्पबुद्धं पबुज्झन्ति सदा गोतमसावका ।
येसं दिवा च रत्तो च निच्चं धम्मगता सति ॥८॥

गौतमाचे शिष्य बुद्धाच्या गुणस्मरणात तल्लीन राहून रात्रंदिव
सदैव धर्मानुचरण करितात.

२९८ सुप्पबुद्धं पबुज्झन्ति सदा गोतमसावका ।
येसं दिवा च रत्तो च निच्चं संघगता सति ॥९॥

गौतमाचे शिष्य बुद्धाच्या गुणस्मरणांत तल्लीन राहून रात्रंदिवस
सदैव संघाचें कल्याण चिंतितात.

मुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

२९९ सुप्पबुद्धं पबुज्झन्ति सदा गोतमसावका ।
येसं दिवा च रत्तो च निच्चं कायगता सति ॥१०॥

गौतमाचे शिष्य बुद्धाच्या गुणस्मरणांत तल्लीन राहून कायिक पाप होऊं न देण्याची खबरदारी घेतात.

३०० सुप्पबुद्धं पबुज्झन्ति सदा गोतमसावका ।
येसं दिवा च रत्तो च अहिंसाय रतो मनो ॥११॥

गौतमाचे शिष्य बुद्धाच्या गुणस्मरणात तल्लीन राहून रात्रंदिवस सदैव अहिंसेत रत असतात.

३०१ सुप्पबुद्धं पबुज्झन्ति सदा गोतमसावका ।
येसं दिवा च रत्तो च भावनाय* रतो मनो ॥१२॥

गौतमाचे शिष्य बुद्धाच्या गुणस्मरणात तल्लीन राहून रात्रंदिवस सदैव भावनेंत (म्हणजे तीव्र विचारात) मग्न असतात.

वैशाली (महावन) वज्जिपुत्तक (भिक्षु)

३०२ दुप्पब्बज्जं दुरभिरमं दुरावासा घरा दुखा ।
दुक्खोऽसमानसंवासो दुक्खानुपतितद्धगू ।
तस्मा न च अद्धगू सिया न च दुक्खानुपतितो सिया
॥१३॥

इच्छेविरुद्ध ग्रहण केलेली प्रव्रज्या दुःखमय असते; गृहस्थी जीवन दुःखमय असतें; असमानाचा सहवास दुःखमय असतो; जीवन यात्राच दुःखमय असते; आणि म्हणून मनुष्याने यात्री होऊं नये आणि दुःखी होऊं नये.

---

* भावना म्हणजे आत्यंतिक चिंतन. भावनेची परिणति स्वाभाविकपणेच आचारांत होते.

जेतवन चित्त (गृहपति)

३०३ सद्धो सीलेन सम्पन्नो यसोभोगसमप्पितो ।
यं यं पदेसं भजति तत्थ तत्थेव पूजितो ॥१४॥

यश आणि भोग हे ज्याने आपल्यापासून काढून टाकले आहेत, असा श्रद्धा व शीलसंपन्न पुरुष जेथे जेथे जातो तेथे पूजित होतो.

जेतवन चुल्ल (सुभद्दा)

३०४ दूरे सन्तो पकासेन्ति हिमवन्तो 'व पब्बता ।
असन्तेत्थ न दिस्सन्ति रत्तिखित्ता यथा सरा ॥१५॥

संत लोक दूर असले तरि हिमालय पर्वताप्रमाणे लांबून सुद्धा प्रकाशमान होतात. पण असंत लोक जवळ असूनहि रात्रीं फेकलेल्या बाणाप्रमाणे दिसत नाहीत.

जेतवन एकटाच हिंडणारा

३०५ एकासनं एकसेय्यं एको चरमतन्दितो ।
एको दमयमत्तानं वनन्ते रमितो सिया ॥१६॥

एकच आसन वापरणारा, एकच शय्या ठेवणारा, एकटाच फिरणारा असा आळसरहित होऊन आपलें संयम कर आणि एकटाच वनांत रममाण हो.

---

## २२ निरय-वग्ग

जेतवन सुन्दर परिव्राजिका

३०६ अभूतवादी निरयं उपेति यो चापि
कत्वा 'न करोमी' ति चाह ।
उभोपि ते पेच्च समा भवन्ति
निहीनकम्मा मनुजा परत्थ ॥१॥

असत्यवादी नरकांत जातात, आणि करून 'मी केलें असें म्हणणारे सुद्धा. हे दोन्ही नीच कर्म करणारे मरणानंतर सारख्याच गतीला जातात.

राजगृह वेणुवन (पापफलानुभवी प्राणी)

३०७ कासावकण्ठा बहवो पापधम्मा असञ्ञता ।
पापा पापेहि कम्मेहि निरयन्ते उप्पज्जरे ॥२॥

खांद्यावर काषाय वस्त्र धारण करणारे कित्ती तरी पापी आणि असंयमी असतात. हे पापी आपल्या पापकर्मांमुळे नरकांत जातात.

वैशाली (वग्गुमुदातीरवासी भिक्षु

३०८ सेय्यो अयोगुलो भुत्तो तत्तोअग्गिसिखूपमो ।
यञ्चे भुञ्जेय्य दुस्सीलो रट्ठपिण्डं असञ्ञतो ॥३॥

असंयमी व दुराचारी राहून राष्ट्राचें अन्न खाण्यापेक्षा अग्नि-शिखेप्रमाणे तप्त लोखंडाचा गोळा खाणें बरें.

खेम (श्रेष्ठी-पुत्री)

जेतवन

३०९ चत्तारि ठानानि नरो पमत्तो आपज्जती परदारूपसेवी ।
अपुञ्ञलाभं न निकामसेय्यं निन्दं ततीयं निरयं चतुत्थं ॥४॥

३१० अपुञ्ञलाभो च गती च पापिका,
भीतस्स भीताय रती च थोकिका ।
राजा च दण्डं गरुकं पणेति
तस्मा नरो परदारं न सेवे ॥५॥

प्रमत्त परस्त्रीगमन करणाऱ्या पुरुषाला चार गति प्राप्त होतात. अपुण्यलाभ, सुखाने-झोप न येणें, निन्दा आणि नरकप्राप्ति. अपुण्य-लाभ, दुर्गति, (दोघेहि स्त्रीपुरुष भीतिग्रस्त असल्यामुळे) अत्यन्त अल्प रति आणि कठोर राजदंड आणि म्हणून मनुष्याने परस्त्रीगमन करूं नये.

जेतवन कटुभाषी ( भिक्षु )

३११ कुसो यथा दुग्गहीतो हत्थमेवानुकन्तति ।
सामञ्ञं दुप्परामट्ठं निरयायुपकड्ढति ॥६॥

नीट न धरलेल्या कुशाने जसा हात कापला जातो तसेंच अविचाराने श्रमण होणारा नरकात जातो.

३१२ यं किञ्चि सिथिलं कम्मं संकिलिट्ठं च यं वतं ।
सङ्कस्सरं ब्रह्मचरियं न तं होति महप्फलं ॥७॥

शिथिलतायुक्त कर्मे, कष्टाने पाळलेलें व्रत व अशुद्ध ब्रह्मचर्य फलदायक नसतात.

३१३ कयिरञ्चे कयिराथेनं दळहमेनं परक्कमे ।
सिथिलो हि परिब्बाजो भिय्यो आकिरते रजं ॥८॥

एखादें काम करावयाचें तर तें दृढ पराक्रमाने करावें. ढिला संन्यासी तुलती धूळच जास्त उडवितो.

जेतवन एक स्त्री

३१४ अकतं दुक्कतं सेय्यो पच्छा तपति दुक्कतं ।
कतञ्च सुकतं सेय्यो यं कत्वा नानुतप्पति ॥९॥

दुष्कृत्य करण्यापेक्षा कांहीहि न करणेंच बरें, कारण दुष्कृत्यामुळे पुढे पश्चात्ताप होतो. सुकृत्य करणें केव्हांहि चांगलें कारण त्यानंतर मनुष्याला पश्चात्ताप होत नाही.

जेतवन पुष्कळ भिक्षु

३१५ नगरं यथा पच्चन्तं गुत्तं सन्तरबाहिरं ।
एवं गोपेथ अत्तानं खणो वे मा उपच्चगा ।
खणातीता हि सोचन्ति निरयम्हि समप्पिता ॥१०॥

---

नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

सीमान्त नगर जसें आंतून बाहेरुन खूप सुरक्षित असतें, तसेंच (मनुष्याने) आपल्याला सुरक्षित ठेवावें. एक क्षणभरहि त्याने प्रमत्त राहूं नये. कारण प्रमाद त्याला रडवील व नरकांत लोटील.

जेतवन जैन साधु

२१६ अलज्जिता ये लज्जन्ति लज्जिता ये न लज्जरे ।
मिच्छादिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति दुग्गतिं ॥१२॥

जेथे लाज बाळगायी लागते तेथे जे निर्लज्ज असतात व जेथे निर्लज्ज असावयास पाहिजे तेथे जे लाजतात असले लोक मिथ्या दृष्टी-मुळे दुर्गतीला जातात.

२१७ अभये च भयदस्सिनो भये च अभयदस्सिनो ।
मिच्छादिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति दुग्गतिं ॥१३॥

जेथे निर्भय असावयास पाहिजे तेथे भय बाळगणें व जेथे भय बाळगावयाचें असतें तेथे बेडर राहणारे लोक मिथ्या दृष्टीमुळे दुर्गतीला जातात.

जेतवन तीर्थिक शिष्य

३१८ अवज्जे वज्जमतिनो वज्जे चावज्जदस्सिनो ।
मिच्छादिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति दुग्गतिं ॥१३॥

निंद्याला जे अनिंद्य मानतात व अनिंद्याला निंद्य, असले मिथ्या-दृष्टि धारण करणारे लोक दुर्गतीला जातात.

३१९ वज्जञ्च वज्जतो ञत्वा अवज्जञ्च अवज्जतो ।
सम्मा दिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति सुग्गतिं ॥१४॥

निन्दनीय वस्तूला निन्दनीय आणि अनिन्दनीय वस्तूला अनि-न्दनीय मानून सम्यक् दृष्टि धारण करणारे लोक सुगतीला जातात.

## २३ नाग–वर्ग

जेतवन — आनन्द (थेर)

३२० अहं नागो'व सङ्गामे चापतो पतितं सरं
अतिवाक्यं तितिक्खिस्सं दुस्सीलो हि बहुज्जनो ॥१॥

रणांत जसा हत्ती धनुष्यांतून सोडलेल्या बाणांना सहन करितो तसेंच मी कटुवचन सहन करीन. जगांत दुर्जन लोकच जास्त आहेत.

३२१ दन्तं नयन्ति समितिं दन्तं राजाभिरूहति ।
दन्तो सेट्ठो मनुस्सेसु यो'तिवाक्यं तितिक्खति ॥२॥

दान्त केलेल्या हत्तीला युद्धांत नेतात व त्यावरच राजा बसतो. ज्याने आपलें दमन केलें आहे, जो परांचे कटुवचन सहन करितो तोच मनुष्यांत श्रेष्ठ आहे.

३२२ वरं अस्सतरा दन्ता आजानीया च सिन्धवा ।
कुञ्जरा च महानागा अत्तदन्तो ततो वरं ॥३॥

खेचर, चांगल्या जातीचे सिंधु घोडे आणि कुंजर हत्ती दान्त केल्यानंतर चांगले असतात. ज्याने आपल्याला दान्त केलें आहे तो सर्वांत श्रेष्ठ होय.

जेतवन — (भूतपूर्व महावत भिक्षु)

३२३ न एतेहि यानेहि गच्छेय्य अगतं दिसं ।
यथाऽत्तना सुदन्तेन दन्तो दन्तेन गच्छति ॥४॥

ह्या यानांनी मनुष्य ज्या दिशेने कधीच गेला नाही त्या दिशेला (म्हणजे निर्वाण–पदाला) जाऊं शकत नाही—जेथे ज्याने आपलें दमन केलें असाच सुदान्त आपल्याला दमन केल्यामुळे जाऊं शकतो.

जेतवन — (परिजीर्ण ब्राह्मणपुत्र)

३२४ धनपालको नाम कुंजरो कटुकप्पभेदनो दुन्निवारयो ।
बद्धो कबलं न भुञ्जति सुमरति नागवनस्स कुञ्जरो ॥५॥

सुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

धनपालक नांवाचा हत्ती मदोन्मत्त असतां दुर्निवार्य होतो, पण बन्धनांत पडला म्हणजे तो गवत खात नाही. त्याला नाग-वनाची आठवण येते.

जेतवन पसेनदी (कोसलराज)

३२५ मिद्धी यदा होति महग्घसो च निद्दायिता सम्परिवत्तसायी ।
महावराहो 'व निवापपुट्ठो पुनप्पुनं गब्भमुपेति मन्दो ॥६॥

मनुष्य जर आळशी, खादाड, निद्रालु-ह्या कडावरून त्या कडावर लोळणारा-खाऊन पिऊन डुकराप्रमाणे पुष्ट झालेला असला तर तो मन्द वारंवार गर्भांत जातो (पुनः पुनः जन्म घेतो).

जेतवन (सानु श्रामणेर)

३२६ इदं पुरे चित्तमचारि चारिकं
येनिच्छकं यत्थ कामं यथासुखं ।
तदज्ज 'हं निग्गहेस्सामि योनिसो
हत्थिप्पभिन्नं विय अङ्कुसग्गहो ॥७॥

पूर्वी हें मन वाटेल तिकडे भटकत होतें, वाटेल तेथे रमत होतें; अशा मनाला मी आज वश करीन-जसा माहूत उन्मत्त हत्तीला अंकुशाने वश करितो.

जेतवन कोसल राजाचा पावेय्यक नांवाचा हत्ती

३२७ अप्पमादरता होथ स-चित्तमनुरक्खथ ।
दुग्गा उद्धरथ'त्तानं पङ्के सन्नो'व कुञ्जरो ॥८॥

सतत जागृत राहून आपल्या चित्ताचें रक्षण करा आणि ह्या कठीण संसारांतून, चिखलांत फसलेल्या हत्तीप्रमाणे आपला उद्धार करा.

परिलेय्यक | पुष्कळसे भिक्षु

३२८ सचे लभेथ निपकं सहायं
सद्धिं चरं साधुविहारिधीरं ।
अभिभुय्य सब्बानि परिस्सयानि
चरेय्य तेनऽत्तमनो सतीमा ॥९॥

जर सोबत विचरण करणारा संयमी व सत्शील मित्र लाभला तर सर्व विघ्ने बाजूला सारून त्याजबरोबर जागृत व प्रसन्न चित्ताने हिंडावें.

३२९ नो चे लभेथ निपकं सहायं
सद्धिं चरं साधुविहारिधीरं
राजा ’व रट्ठं विजितं पहाय
एको चरे मातङ्ग ’रञ्ञेव नागो ॥१०॥

जर सोबत विचरण करणारा संयमी व सत्शील मित्र न लाभला तर पराजित राष्ट्राचा त्याग करणाऱ्या राजाप्रमाणे वनात एकटाच हिंडणाऱ्या हस्तिराजासारखा तूं एकटाच विहर.

३३० एकस्स चरितं सेय्यो नत्थि बाले सहायता ।
एको चरे न च पापानि कयिरा
अप्पोस्सुक्को मातङ्ग ’रञ्ञे’व नागो ॥११॥

एकटेंच राहणें उत्तम आहे; मूर्खांची संगति बरी नसते; वनात हिंडणाऱ्या हस्तिराजाप्रमाणे अनुत्सुक राहून तूं एकटाच विहर; पाप करूं नकोस.

हिमवत् प्रदेश | मार

३३१ अत्थम्हि जातम्हि सुखा सहाया
तुट्ठी सुखा या इतरीतरेन ।
पुञ्ञं सुखं जीवितसंखयम्हि
सब्बस्स दुक्खस्स सुखं पहाणं ॥१२॥

---

नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिको भव॥

विपत्तिकाळीं मुखानें आहे. मित्र असणें. इतरांना दिलेल्या समाधानात सुख आहे; जीवनांत संपादन केलेलें पुण्य मृत्यूनंतर तुमचें सुख आहे.

३३२ सुखा मत्तेय्यता लोके अथो पेत्तेय्यता सुखा ।
सुखा सामञ्ञता लोके अथो ब्रह्मञ्ञता सुखा ॥१३॥

ह्या जगांत आई-वडिलांची सेवा सुख आहे; ह्या जगांत श्रामण्य अथवा संन्यास सुखकर आहे; व ह्या जगांत ब्राह्मणत्व सुख आहे.

३३३ सुखं याव जरा सीलं सुखा सद्धा पतिट्ठिता ।
सुखो पञ्ञाय पटिलाभो पापानं अकरणं सुखं ॥१४॥

वृद्धावस्थेपर्यंत शीलाचें पालन सुख आहे; श्रद्धा स्थिर होणें सुख आहे; प्रज्ञेचा लाभ सुख आहे व पाप न करणें सुख आहे.

---

## २४ तृष्णा-वर्ग

कपिलमच्छ

जेतवन

३३४ मनुजस्स पमत्तचारिनो तण्हा वड्ढति मालुवा विय ।
सो पलवती हुराहुरं फलमिच्छं 'व वनस्मि वानरो ॥१॥

प्रमत्त राहून विचरणाऱ्या मनुष्याची तृष्णा मालुवा लतेप्रमाणें वाढत जाते. अरण्यात फळ खाण्याच्या इच्छेनें वानर जसा ह्या झाडावरून त्या झाडावर उडया मारतो तसाच मनुष्य ह्या जगात वावरतो.

३३५ यं एसा सहती जम्मी तण्हा लोके विसत्तिका ।
सोका तस्स पवड्ढन्ति अभिवट्ठं 'व बीरणं ॥२॥

ही विषारी नीच तृष्णा ज्याला वश करिते त्याचा शोक वर्षाऋतूंतील विरण गवताप्रमाणे वाढत जातो.

३३६ यो चेतं सहतो जम्मि तण्हं लोके दुरच्चयं ।
सोका तम्हा पपतन्ति उदबिन्दू 'व पोक्खरा ॥३॥

जो मनुष्य ह्या नीच व दुस्त्याज्य तृष्णेला जिंकितो त्याचे सर्व शोक कमळावरून जसें पाणी निघून जातें—तसे विरून जातात.

३३७ तं वो वदामि भद्दं वो यावन्तेत्थ समागता ।
तण्हाय मूलं खणथ उसीरत्थो 'व वीरणं ।
मा वो नलं व सोतो व मारो भञ्जि पुनप्पुनं ॥४॥

आणि म्हणून तुम्ही सर्व जे येथे जमलांत त्या सर्वांना तुमच्या कल्याणाकरिता सांगतो की तृष्णेचें मूळ खणून काढा—जसें वाळ्याकरिता विरण गवत काढतात. पाण्याचा प्रवाह जसा बोरूला उपटून फेकतो, तसें मार (कामदेव) तुम्हाला वारंवार न फेको.

जेतवन गूथ—सूकर—पोतिक

३३८ यथापि मूले अनुपद्दवे दळ्हे
छिन्नोपि रुक्खो पुनरेव रूहति ।
एवम्पि तण्हानुसये अनूहते
निब्बत्तति दुक्खमिदं पुनप्पुनं ॥५॥

समूळ नष्ट न करितां कापलेलें झाड जसें पुनः वाढतें, तसेंच तृष्णाशय नष्ट झाल्याशिवाय हें दुःखचक्र फिरतच राहतें.

३३९ यस्स छत्तिंस*सती सोता मनापस्सवना भुसा ।
वाहा वहन्ति दुद्दिट्ठिं सङ्कप्पा रागनिस्सिता ॥६॥

---

* पांच इंद्रियें—कान, डोळे, जिव्हा, नाक, शरीर—व सहावें मन, ह्यांचे सहा विषय आणि त्यांची सहा विज्ञानें म्हणजे स्पर्श या संयोग असे एकूण अठरा. अठरा धातु बाह्य आणि अठरा अभ्यन्तर मिळून छत्तीस.

नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

ज्याचे छत्तीस श्रोत संसारांत प्रिय पदार्थांकडे वाहतात त्याचे रागपूर्ण संकल्प त्याला दुर्दृष्टीकडे वाहून नेतात.

३४० सवन्ति सब्बधि सोता लता उब्भिज्ज तिठ्ठति ।
तञ्च दिस्वा लतं जातं मूलं पञ्ञाय छिन्दथ ॥७॥

हे प्रवाह सगळीकडेच वाहतात. त्यामुळे लता उद्भवतात. ह्या उद्भवलेल्या लतांना पाहून प्रज्ञेने त्यांचे मूळच खणून काढा.

३४१ सरितानि सिनेहितानि च सोमनस्सानि भवन्ति जन्तुनो ।
ते सोतसिता सुखेसिनो ते वे जाति-जरूपगा नरा ॥८॥

तृष्णेचे प्रवाह प्राण्यांना फार गोड आणि मनोहर वाटतात. सुख-लोलुप तिच्या प्रवाहांत पडतात आणि वारंवार जन्म आणि जरा यांच्या चक्रांत सापडतात.

३४२ तसिणाय पुरक्खता पजा परिसप्पन्ति ससो 'व बाधितो ।
सञ्ञोजनसङ्गसत्ता दुक्खमुपेन्ति पुनप्पुनं चिराय ॥९॥

तृष्णेच्या तावडीत सापडलेले प्राणी बांधलेल्या सशाप्रमाणे चक्कर मारतात. बन्धनांत पडलेले लोक पुनः पुनः दीर्घकालपर्यंत दुःख भोगतात.

३४३ तसिणाय पुरक्खता पजा परिसप्पन्ति ससो 'व बाधितो ।
तस्मा तसिणं विनोदये भिक्खू आकङ्खी विरागमत्तनो ॥१०॥

तृष्णेच्या तावडीत सापडलेले प्राणी बांधलेल्या सशाप्रमाणे चक्कर मारतात. म्हणून वैराग्याची आकांक्षा बाळगून भिक्षूने तृष्णा दूर करावी.

विभन्तक (भिक्षु)

वेळुवन

३४४ यो निब्बनथो वनाधिमुत्तो वनमुत्तो वनमेव धावति ।
तं पुग्गलमेव पस्सथ मुत्तो बन्धनमेव धावति ॥११॥

निर्वन व वनमुक्त होऊन वनाबाहेर पडलेला मनुष्य पुनः वनाकडे (संसाराकडे धावतो अशा मनुष्याकडे पहा. तो मुक्त पुरुष पुनः बन्धनाकडे जातो.

जेतवन | बन्धनागार

३४५ न तं दळ्हं बन्धनमाहु धीरा यदायसं दारुजं पब्बजञ्च।
सारत्तरत्ता मणिकुण्डलेसु पुत्तेसु दारेसु च या अपेक्खा ॥१२॥

धीर लोक लोखंडी साखळीला, किंवा लाकडी किंवा दोरीच्या बंधनाला मोठें बन्धन मानीत नाहीत. वास्तविक ह्यापेक्षाहि मोठें बन्धन मणिकुण्डल, पुत्र आणि स्त्री ह्यांत आसक्ति असणें हें होय.

३४६ एतं दळ्हं बन्धनमाहु धीरा
ओहारिनं सिथिलं दुप्पमुञ्चं।
एतम्पि छेत्वान परिब्बजन्ति
अनपेक्खिनो कामसुखं पहाय ॥१३॥

धीर लोक ह्यालाच खरें बन्धन म्हणतात. कारण तें जरि ढिलें असलें तरि रम्य आणि सुटायला कठीण असें आहे. कामवासनांचा त्याग करून धीर पुरुष निरिच्छ म्हणजेच प्रव्रजित अथवा गृह-रहित होतात आणि हें बन्धन तोडून टाकतात.

राजगृह (वेणुवन) | खेमा (बिम्बीसार-महिषी)

३४७ ये रागरत्तानुपतन्ति सोतं
सयं कतं मक्कटकोव जालं।
एतम्पि छेत्वान वजन्ति धीरा
अनपेक्खिनो सब्ब दुक्खं पहाय ॥१४॥

जे लोक रागांत आसक्त आहेत ते स्वतः निर्माण केलेल्या जाळ्यांत कोळी जसा पडतो त्याप्रमाणे प्रवाहात पडतात. पण धीर पुरुष यास छेदून सर्व दुःखापासून मुक्त होऊन निरिच्छ होतात.

राजगृह वेणुवन

उग्रसेन (श्रेष्ठी)

३४८ मुञ्च पुरे मुञ्च पच्छतो मज्झे मुञ्च भवस्स पारगू ।
सब्बत्थ विमुत्तमानसो न पुन जातिजरं उपेहिसि ॥१५॥

पुढचा, मागचा व मधला ह्या सर्वांचा त्याग करा आणि भवपार व्हा. येणेप्रमाणे सर्व तऱ्हेने मन प्रसन्न झालें म्हणजे जाति आणि जरा यांच्या फेऱ्यांतून सुटाल.

जेतवन

(चुल्ल) धनुग्गह पंडित

३४९ वितक्कपमथितस्स जन्तुनो तिब्बरागस्स सुभानुपस्सिनो ।
भिय्यो तण्हा पवड्ढति एसो खो दळ्हं करोति बन्धनं ॥१६॥

जो प्राणि संशय-युक्त आहे, तीव्र आसक्तीने भरलेला आहे, जिकडे तिकडे शुभ पाहून त्याने आकर्षिला जाणारा आहे, त्याची तृष्णा पुनः पुनः वाढते व तो आपले बन्धन दृढ करितो.

३५० वितक्कूपसमे च यो रतो असुभं भावयति सदा सतो ।
एस खो ब्यन्तिकाहिती एसच्छेच्छति मारबन्धनं ॥१७॥

वाईट विचारांना शांत करण्यात जो गुंतला आहे, जो दक्षतापूर्वक नेहमी अशुभ भावना ( म्हणजे सर्व वस्तू अनित्य अतः दुःखमय आहेत अशी भावना ) बाळगतो असला पुरुष माराच्या बन्धनाला तोडून टाकील

जेतवन

मार

३५१ निट्ठङ्गतो असन्तासी वीततण्हो अनङ्गणो ।
उच्छिज्ज भवसल्लानि अन्तिमोऽयं समुस्सयो ॥१८॥

जो निष्पाप झाला आहे, ज्याची तृष्णा नष्ट झाली आहे, जो सर्व आशापासून मुक्त आहे, ज्याचे सर्व भवपाश तुटल्यामुळे त्याचा हा अंतिम देह आहे.

३५२ वीततण्हो अनादानो निरुत्तिपदकोविदो ।
अक्खरानं सन्निपातं जञ्ञा पुब्बापरानि च
स वे अन्तिमसारीरो महापञ्ञो'ति वुच्चति ॥१९॥

जो तृष्णारहित, अपरिग्रही व काव्य व भाषाशास्त्रज्ञ आहे—म्हणजे अगोदर कोणता शब्द ठेवावा व नंतर कोणता हें जो जाणतो—असला पुरुष खचितच अंतिम शरीरधारी असून महाप्राज्ञ म्हणविला जातो.

वाराणसी ते गयेच्या मार्गावर उपक (आजीवक)

३५ सब्बाभिभू सब्बविदूहमस्मि
सब्बेसु धम्मेसु अनूपलित्तो ।
सब्बञ्जहो तण्हक्खये विमुत्तो
सयं अभिञ्ञाय कमुद्दिसेय्यं ॥२०॥

मी सर्वांना (काम-क्रोधादींना) जिंकणारा आहे, मी सर्व जाणणारा आहे, चित्ताच्या सर्व प्रवृत्तींपासून मी अलिप्त आहे, मी सर्व त्यागी आहे, तृष्णा-क्षयामुळे मी सर्व तऱ्हेने मुक्त आहे, मी स्वतःच परमज्ञान प्राप्त केलें आहे (अशा स्थितीत) कोणाला मी आपला गुरु म्हणूं!

जेतवन सक्क देवराज

३५४ सब्बदानं धम्मदानं जिनाति
सब्बं रसं धम्मरसो जिनाति ।
सब्बं रतिं धम्मरती जिनाति
तण्हक्खयो सब्बदुक्खं जिनाति ॥२१॥

सर्व दानांत धर्म-दान श्रेष्ठ आहे; सर्व रसांत धर्म-रस श्रेष्ठ आहे; सर्व आसक्तींत धर्मासक्ति श्रेष्ठ आहे. तृष्णेचा क्षय हा सर्व दुःखांना जिंकणारा आहे.

जेतवन (अपुत्रक श्रेष्ठी)

३५५ हनन्ति भोगा दुम्मेधं नो चे पारगवेसिनो ।
भोगतण्हाय दुम्मेधो हन्ति अञ्ञे' व अत्तनं ॥२२॥

जो पुरुष संसारापलीकडे जाणें चाहत नाही अशा बुद्धिहीन मनुष्याला त्याचे भोगच नष्ट करितात. भोगतृष्णेंत मग्न असलेला हा पुरुष आत्मघातकी बनून स्वतःचाच नाश करितो.

पाण्डुकम्बलशिला ( देवलोक ) अङ्कुर

३५६ तिणदोसानि खेत्तानि रागदोसा अयं पजा ।
तस्मा हि वीतरागेसु दिन्नं होति महप्फलं ॥२३॥

शेतांचा दोष गवत आहे; प्रजेचा ( मनुष्यमात्राचा ) दोष राग आहे; आणि म्हणून वीतराग पुरुषांना दिलेले महान् (दान) फलदायक होतें.

३५७ तिणदोसानि खेत्तानि दोसदोसा अयं पजा ।
तस्मा हि वीतदोसेसु दिन्नं होति महप्फलं ॥२४॥

शेतांचा दोष तृण आहे; प्रजेचा दोष द्वेष आहे; आणि म्हणून वीतद्वेष (द्वेषरहित) पुरुषांना दिलेलें (दान) महान् फलदायक होतें.

३५८ तिणदोसानि खेत्तानि मोहदोसा अयं पजा ।
तस्मा हि वीतमोहेसु दिन्नं होति महप्फलं ॥२५॥

शेतांचा दोष तृण आहे; प्रजेचा दोष मोह आहे; आणि म्हणून वीत-मोहाला दिलेलें (दान) महान् फल-दायक होतें.

३५९ तिणदोसानि खेत्तानि इच्छादोसा अयं पजा ।
तस्मा हि विगतेच्छेसु दिन्नं होति महप्फलं ॥२६॥

शेतांचा दोष तृण आहे; प्रजेचा दोष इच्छा आहे; आणि म्हणून इच्छारहित पुरुषाला दिलेलें (दान) महान् फलदायक होतें.

---

## २५ भिक्षु-वर्ग

जेतवन — पांच भिक्षु

३६० चक्खुना संवरो साधु साधु सोतेन संवरो ।
घाणेन संवरो साधु साधु जिव्हाय संवरो ॥१॥

डोळयाचा संयम चांगला, कानाचा संयम चांगला, नाकाचा संयम चांगला आणि जिभेचा संयम चांगला.

३६१ कायेन संवरो साधु, साधु वाचाय संवरो ।
मनसा संवरो साधु साधु सब्बत्थ संवरो ।
सब्बत्थ संवुतो भिक्खु सब्बदुक्खा पमुच्चति ॥२॥

काया-संयम चांगला, वाचा-संयम चांगला, मनाचा संयम चांगला, सर्व इंद्रियांचा संयम चांगला. सर्व बाजूंनी संयमयुक्त असलेला भिक्षु सर्व दुःखापासून मुक्त असतो.

जेतवन — हंसघातक (भिक्षु)

३६२ हत्थसञ्ञतो पादसञ्ञतो
वाचाय सञ्ञतो सञ्ञतुत्तमो ।
अज्झत्तरतो समाहितो एको
सन्तुसितो तमाहु भिक्खुं ॥३॥

---

ज्याचे हातांत, पायात व वाणींत संयम आहे, (जो) उत्तम संयमी आहे, जो आपल्यांतच रममाण आहे, जो समाधियुक्त आहे, जो एकटाच व संतुष्ट असतो, त्याला भिक्षु म्हणतात.

जेतवन कोकालिय

३६३ यो मुखसञ्ञतो भिक्खु मन्तभाणी अनुद्धतो ।
अत्थं धम्मंच दीपेति मधुरं तस्स भासितं ॥४॥

जो मुख-संयत आहे, विचारपूर्वक बोलतो, जो लीन आहे, जो अर्थ आणि धर्म यांना प्रगट करितो, अशा भिक्षूचें भाषण मधुर असतें.

जेतवन धम्माराम (थेर)

३६४ धम्मारामो धम्मरतो धम्मं अनुविचिन्तयं ।
धम्मं अनुस्सरं भिक्खु सद्धम्मा न परिहायति ॥५॥

धर्मांत आनंद मानणारा, धर्मांत रममाण असणारा, धर्माचें चिंतन करणारा आणि धर्माप्रमाणे वागणारा भिक्षु सद्धर्मापासून च्युत होत नाही.

राजगृह (वेणुवन) विपक्ष-सेवक भिक्षु

३६५ सलाभं नातिमञ्ञेय्य, नाञ्ञेसं पिहयं चरे ।
अञ्ञेसं पिहयं भिक्खू समाधिं नाधिगच्छति ॥६॥

आपल्या हिताची अवहेलना करूं नये, दुसऱ्यांच्या हिताची स्पृहा करूं नये, दुसऱ्यांच्या हिताची स्पृहा करणारा भिक्षु समाधिं प्राप्त करूं शकत नाही.

३६६ अप्पलाभोपि चे भिक्खु सलाभं नातिमञ्ञति ।
तं वे देवा पसंसन्ति सुद्धाजीविं अतन्दितं ॥७॥

अल्पच कां होईना तरी पण भिक्षु स्वलाभ सोडीत नाही. जो शुद्धजीवि व अप्रमादी आहे त्याची देव स्तुति करितात.

जेतवन पुष्कळ भिक्षु

३६७ सब्बसो नामरूपस्मिं यस्स नत्थि ममायितं ।
असता च न सोचति स वे भिक्खूति वुच्चति ॥८॥

ज्याचा अहंकार व सर्व वस्तूंवरील आसक्ति व ममत्व नष्ट झालें आहे व आपण अकिंचन आहों याबद्दल ज्याला शोक नसतो तोच खरा भिक्षु होय.

३६८ मेत्ताविहारी यो भिक्खु पसन्नो बुद्धसासने ।
अधिगच्छे पदं संतं सङ्खारूपसमं सुखं ॥९॥

जो भिक्षु मैत्रींत रमलेला असतो, जो बुद्धशासनांत प्रसन्न असतो, तो सर्व संस्कारांना शमन करणारें सुखमय शान्तिपद प्राप्त करितो.

३६९ सिञ्च भिक्खु ! इमं नावं सित्ता ते लहुमेस्सति ।
छेत्वा रागं च दोसं च ततो निब्बानं एहिसी ॥१०॥

हे भिक्षु, तूं ही नाव रिकामी कर. रिकामी झाली म्हणजे ती हलकी होईल. राग आणि द्वेष यांचा नाश केलास तर तूं निर्वाणाला जाशील.

३७० पंच छिन्दे पंच जहे पंच चुत्तरि भावये ।
पंच सङ्गातिगो भिक्खु ओघतिण्णो' ति वुच्चति ॥११॥

पांच (वर्तमान) बन्धनांना तोडून टाकावें, पांच (पुढील) बन्धनांचा त्याग करावा, आणि पांच (मागील) बन्धनांचा विचार करावा. पांच बन्धनांच्या पलीकडे गेलेल्या भिक्षुला 'तीर्णस्रोत' म्हणतात.*

---

* राग, द्वेष, आळस, मिथ्यार्मे चांचल्य आणि संयम ही पांच बन्धनें आहेत. भूत काळाचा विचार करून त्यापासून उचित बोध घ्यावा. वर्तमान नष्ट करावा आणि भविष्याचा त्याग करावा म्हणजे त्याची आशा सोडावी.

३७१ झाय भिक्खु ! मा च पमादो
मा ते कामगुणे भमस्सु चित्तं ।
मा लोहगुळं गिळी पमत्तो
मा कन्दी दुक्खमिदन्ति डय्हमानो ॥१२॥

हे भिक्षु, मनन कर, प्रमादांत राहूं नको. तुझें चित्त कामोपभोगांत रमूं देऊं नको. प्रमत्त होऊन लोखंडाचा तापलेला लाल गोळा गिळूं नकोस. त्याने दग्ध होऊन 'हाय! हें दुःख!' असें म्हणण्याचा तुजवर प्रसंग न येवो.

३७२ नत्थि झानं अपञ्ञस्स पञ्ञा नत्थि अझायतो ।
यम्हि झानं च पञ्ञा च स वे निब्बाणसन्तिके ॥१३॥

प्रज्ञाविहीन पुरुषाला ध्यानभावना नसते, व ध्यानभावना नसणाराला प्रज्ञा नसते. ज्याच्यात ध्यानभावना व प्रज्ञा दोन्ही आहेत असाच पुरुष निर्वाणाच्या जवळ आहे.

३७३ सुञ्ञागारं पविट्ठस्स सन्तचित्तस्स भिक्खुनो ।
अमानुसी रती होति सम्मा धम्मं विपस्सतो ॥१४॥

एकान्तस्थानांत प्रवेश करताना सम्यक् धर्म जाणणाऱ्या शान्तिप्रिय भिक्षुला एक प्रकारचा विशेष आनंद होतो.

३७४ यतो यतो सम्मसति खन्धानं उदयब्बयं ।
लभति पीतिपामोज्जं अमतं तं विजानतं ॥१५॥

(मनुष्य) जसा जसा (रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञान या) पांच स्कन्धांच्या उत्पत्ति आणि विनाशाचा विचार करितो, तसा तसा तो ज्ञान्यांचें जें अमृत अशा परम सुखाचा भागीदार होतो.

३७५ तत्रायमादि भवति इध पञ्ञस्स भिक्खुनो ।
इन्द्रियगुत्ती सन्तुट्ठी पातिमोक्खे च संवरो ।
मित्ते भजस्सु कल्याणे सुद्धाजीवे अतन्दिते ॥१६॥

प्रज्ञायुक्त भिक्षूच्या जीवनाचा येणेंप्रमाणे प्रारंभ होतो—
इंद्रियांवर ताबा ठेवणें, संतुष्ट असणें, प्रतिमोक्ष नियमांचें पालन करणें, तसेंच शुद्धजीवी, आळसहीन आणि सज्जन मित्रांची संगति करणें.

३७६ पटिसन्थारवुत्यस्स आचारकुसलो सिया ।
ततो पामोज्जबहुलो दुक्खस्सन्तं करिस्सति ॥१७॥

जो सेवा व सत्कारधर्मी असून सदाचारी आहे तो आनन्दानें आपल्या दुःखाचा अन्त करील.

जेतवन | पांचशें भिक्षु

३७७ वस्सिका विय पुप्फानि मद्दवानि पमुञ्चति ।
एवं रागञ्च दोसञ्च विप्पमुञ्चेथ भिक्खवो ॥१८॥

जुईच्या झाडावरून जशी कोमेजलेली फुलें गळून पडतात, त्या-प्रमाणे हे भिक्षूंनो, तुमच्यांतून राग आणि द्वेष गळून पडूं द्या.

जेतवन | शान्तकाय (थेर)

३७८ सन्तकायो सन्तवाचो सन्तवा सुसमाहितो
वन्तलोकामिसो भिक्खु उपसन्तो 'ति वुच्चति ॥१९॥

(जो) काया आणि वाचेनें शान्त आहे, जो चांगल्या रीतीनें समाधियुक्त आहे, ज्यानें लोकामिषाला ओकून टाकलें आहे अशा भिक्षूला उपशान्त म्हणतात.

जेतवन | [illegible] (

३७९ अत्तना चोदय'त्तानं पटिमासे अत्तमत्तना ।
सो अत्तगुत्तो सतिमा सुखं भिक्खु विहाहिसि ॥२०

जो आपणच आपल्याला चाबूक मारील, आपणच स्वतःला कामाला लावील, असला आत्म–रक्षित स्मृति संयुक्त भिक्षु सुखपूर्वक विचरेल.

३८० अत्ता हि अत्तनो नाथो अत्ता हि अत्तनो गति ।
तस्मा सञ्ञमयत्तानं अस्सं भद्रं'व वाणिजो ॥२१॥

मनुष्य हा स्वतःच आपला स्वामी आहे; तो स्वतःच आपली गति आहे. आणि म्हणून मनुष्याने आपलें दमन करावें जसें वाणी सुन्दर घोड्याला दान्त करितो.

राजगृह (वेणुवन) वक्कलि (थेर)

३८१ पामोज्जबहुलो भिक्खु पसन्नो बुद्धसासने ।
अधिगच्छे पदं सन्तं सङ्खारूपसमं ॥२२॥

बुद्ध–शासनांत रमलेला आनंदी भिक्षु सर्व संस्कारांना शान्त करणाऱ्या सुखमय शान्त–पदाला प्राप्त करितो.

श्रावस्ती (पूर्वाराम) सुमन (सामनेर)

३८२ यो ह वे दहरो भिक्खु युञ्जति बुद्धसासने ।
सो इमं लोकं पभासेति अब्भा मुत्तो'व चन्दिमा ॥२३॥

जो भिक्षु तारुण्यांत बुद्ध–शासनात संलग्न असतो तो मेघ–मुक्त चंद्राप्रमाणे जगाला प्रकाशित करितो.

---

## २६ ब्राह्मण वर्ग

जेतवन (एक पुष्कळ श्रद्धाळु ब्राह्मण)

३८३ छिन्द सोतं परक्कम्म कामे पनुद ब्राह्मण ।
संखारानं खयं ञत्वा अकतञ्ञूसि ब्राह्मण ॥१॥

हे ब्राह्मणा ! पराक्रम कर; (तृष्णारूपी) प्रवाहाला छाटून टाक; काम–

वासनांचा त्याग कर आणि संस्कारक्षयाचा साक्षात्कार करुन अकृतज्ञ* हो म्हणजे निर्वाण पद प्राप्त कर.

जेतवन पुष्कळ भिक्षु

३८४ यदा द्वयेसु धम्मेसु पारगू होति ब्राह्मणो ।
अथस्स सब्बे संयोगा अत्थं गच्छन्ति जानतो ॥२॥

ब्राह्मण जेव्हा दोन† धर्मांत पारंगत होतो तेव्हा त्या ज्ञानी पुरुषाचीं सर्व बंधनें नष्ट होतात.

---

* अकृत = निर्वाण. निर्वाणाला अकृत म्हणण्याचें कारण हें की तें पंचमहाभूतांचें बनलेलें नसून पंचमहाभूतापासून अलिप्त आहे आणि म्हणून अकृत. अकृताचा अर्थ असा नाही की तें मनुष्याच्या कृतीच्या पलीकडे आहे. अर्थात् हें पद मनुष्य स्वपराक्रमाने मिळवूं शकतो हें उघड आहे.

† दोन धर्म = समथ आणि विपश्यना. (१) कामवासना (२) द्वेष (३) आळस (४) चित्ताची चंचलता आणि (५) संशय हे पांच नीवरणें अथवा आवरणें मानले जातात. मनुष्य जेव्हा ह्या पांच निवरणांवर विजय प्राप्त करून समाधि मिळवितो तेव्हा त्या समाधीला समथ (शमथ) समाधि म्हणतात. ह्यांत ध्येयप्राप्तीकरिता ह्या नीवरणांचा प्रत्यक्ष नाश करण्याची कल्पना आहे. पण मनुष्य जेव्हा हें जग अनित्य, अनात्म आणि दुःखद आहे ही भावना जागृत करून जी समाधि मिळवितो तिला विपश्यना समाधि म्हणतात. समथ समाधीला 'लौकिक' व विपश्यना 'समाधीला' लोकोत्तर सुद्धा म्हणतात. पहिल्या कल्पनेंत, ज्या कारणामुळे घाण निर्माण होते त्या कारणावरच प्रत्यक्ष आघात असून घाण काढून टाकण्यावरच जोर आहे; तर दुसऱ्या कल्पनेंत घाण आंत न येऊं देण्यावर जोर आहे. वास्तविक दोन्ही कल्पनेच्या मुळाशीं एकच उद्दिष्ट (म्हणजे चित्तशुद्धि ) असल्यामुळे ह्या दोन धर्मांमध्ये

सात्त्विक फरक नाही. फरक असलाच तर तो केवळ तपशिलाचा असून किरकोळ आहे.

जेतवन — मार

३८५ यस्स पारं अपारं वा पारापारं न विज्जति ।
वीतद्दरं विसञ्ञुत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३॥

ज्याचे पार अथवा पलीकडील तीर व अपार हीं दोन्ही नष्ट झाली आहेत (म्हणजे ज्याला इहलोक अथवा परलोक दोन्ही नाहीत); जो निर्भय व अनासक्त आहे अशालाच मी ब्राह्मण म्हणतो.

जेतवन — कोणी ब्राह्मण

३८६ झायिं विरजमासीनं कतकिच्चं अनासवं ।
उत्तमत्थं अनुप्पत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥४॥

जो ध्यानी, निर्मल, स्थिर, कृतकृत्य, आस्रवरहित व सिद्धार्थ आहे अशालाच मी ब्राह्मण म्हणतो.

श्रावस्ती (पूर्वाराम) — आनंद (थेर)

३८७ दिवा तपति आदिच्चो रत्तिं आभाति चन्दिमा ।
सन्नद्धो खत्तियो तपति झायी तपति ब्राह्मणो ।
अथ सब्बमहोरत्तिं बुद्धो तपति तेजसा ॥५॥

दिवसा सूर्य प्रकाशतो, रात्री चंद्र प्रकाशतो; कवचबद्ध असल्यामुळे क्षत्रिय प्रकाशतो, ध्यानी असल्यामुळे ब्राह्मण प्रकाशतो, आणि बुद्ध रात्रंदिवस आपल्या तेजाने प्रकाशमान असतो.

जेतवन — कोणी प्रव्रजित

३८८ बाहितपापो 'ति ब्राह्मणो समचरिया समणो 'ति वुच्चति ।
पब्बाजयमत्तनो मलं तस्मा पब्बजितो, 'ति वुच्चति ॥६॥

ज्याने आपलीं पापें वाहवून दिलीं आहेत त्याला ब्राह्मण व जो समतेनें आचरण करितो त्याला श्रमण म्हणतात. ज्याने आपला मळ धुवून टाकला आहे तो त्यामुळे प्रव्रजित म्हणवितो.

जेतवन सारिपुत्र (थेर)

३८९ न ब्राह्मणस्स पहरेय्य नास्स मुंचेथ ब्राह्मणो ।
धि ब्राह्मणस्स हन्तारं ततो धि यस्स मुञ्चति ॥७॥

ब्राह्मणाला मारूं नये; ब्राह्मणाने सुद्धा मारणारावर रागावूं नये; ब्राह्मणाला जो मारतो त्याचा धिक्कार असो; आणि धिक्कार त्याचाहि की जो मारणारावर रागावतो

३९० न ब्राह्मणस्सेतदकिञ्चि सेय्यो
यदा निसेधो मनसो पियेहि ।
यतो यतो हिंसमनो निवत्तति
ततो ततो सम्मति एव दुक्खं ॥८॥

प्रिय वस्तूंचा मनाने निषेध करण्यांत ब्राह्मण कांहीं लहान श्रेय संपादन करीत नाही. जसा जसा तो हिंसेपासून दूर राहील तसतसा तो आपलें दुःख निवारील.

जेतवन महाप्रजापति गोमती

३९१ यस्स कायेन वाचाय मनसा नत्थि दुक्कतं ।
संवुतं तीहि ठानेहि तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥९॥

काया, वाचा आणि मनाने जो निष्पाप आहे आणि जो तिन्ही बाजूंनी सुरक्षित असा आहे त्यालाच मी ब्राह्मण म्हणतों.

जेतवन सारिपुत्र (थेर)

३९२ यम्हा धम्मं विजानेय्य सम्मासम्बुद्धदेसितं ।
सक्कच्चं तं नमस्सेय्य अग्गिहुतं 'व ब्राह्मणो ॥१०॥

नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

ज्याच्यापासून सम्यक् सम्बुद्धाचा उपदेश जाणला जातो अशा पुरुषाला सत्कारपूर्वक नमस्कार करावा, जसा ब्राह्मण अग्निहोत्रास करितो.

जेतवन — जटिल ब्राम्हण

३९३ न जटाहि न गोत्तेहि न जच्चा होति ब्राह्मणो।
यम्हि सच्चं च धम्मो च सो सुची सो च ब्राम्हणो ॥११॥

जटा वाढविल्याने, गोत्राने किंवा जातीने मनुष्य ब्राम्हण होत नाही. ज्यात सत्य व धर्म आहे तोच पवित्र, तोच ब्राम्हण.

वैशाली (कूटागार शाळा) — (पाखंडी ब्राम्हण)

३९४ किं ते जटाहि दुम्मेध ! किं ते अजिनसाटिया।
अब्भन्तरं ते गहनं बाहिरं परिमज्जसि ॥१२॥

हे दुर्बुद्धे ! जटा वाढविल्याने किंवा मृगचर्माने काय होणार आहे ? आत तर तूं फार खोल आहेस, नुसती वरची घासघूस करण्यांत काय अर्थ ?

राजगृह (गृध्रकूट) — किसा गोमती

३९५ पंसुकूलधरं जन्तुं किसं धमनिसन्थतं।
एकं वनस्मि झायन्तं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥१३॥

मी त्याला ब्राम्हण म्हणतो जो धुळीने भरलेली फाटकी वस्त्रे नेसलेला आहे, कृश असल्यामुळे ज्याच्या अंगावरच्या शिरा दिसतात व जो एकटाच अरण्यांत ध्यान करीत असतो.

जेतवन — एक ब्राम्हण

३९६ न चाहं ब्राम्हणं ब्रूमि योनिजं मत्तिसंभवं।
'भो वादि' नाम सो होति स चे होति सकिञ्चनो।
अकिञ्चनं अनादानं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥१४॥

ब्राम्हण आईच्या पोटी जन्मल्यामुळे मी एखाद्यास ब्राम्हण म्हणत नाही. जर सधन असला तर तो 'महाराज' म्हणून संबोधिला जाईल. जो अकिंचन व त्यागी आहे त्यालाच मी ब्राम्हण म्हणतो.

राजगृह (वेणुवन) उग्गसेन (श्रेष्ठीपुत्र)

३९७ सब्बसंयोजनं छेत्वा यो वे न परितस्सति ।
सङ्गातिगं विसञ्ञुत्तं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥१५॥

जो सर्व संयोजनांना छेदून टाकतो व त्यामुळे दुःखी नसतो, जो संग आणि आसक्तीपासून मुक्त आहे अशाला मी ब्राम्हण म्हणतो.

जेतवन दोन ब्राम्हण

३९८ छेत्वा नन्दिं वरत्तं च सन्दामं सहनुक्कमं ।
उक्खित्तपलिघं बुद्धं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥१६॥

क्रमाने ज्याने दोरी, वादी, आणि साखळी ह्या सर्व बन्धनांना तोडून आपले जूं फेकून दिले व जो बुद्ध झाला, त्याला मी ब्राम्हण म्हणतो.

राजगृह (वेणुवन) (अक्कोस) भारद्वाज

३९९ अक्कोसं वधबन्धं च अदुट्ठो यो तितिक्खति ।
खन्तीबलं बलानीकं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥१७॥

जो निंदा, मार आणि बन्धन यांना निर्विकारपणे सहन करितो, जो क्षमाबळाचा सेनापति आहे त्यास मी ब्राम्हण म्हणतो.

राजगृह (वेणुवन) सारिपुत्त (थेर)

४०० अक्कोधनं वतवन्तं सीलवन्तं अनुस्सुतं ।
दन्तं अन्तिमसारीरं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥१८॥

पिशिना महोत्पन्न परमेष्ठिन्निरागंज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकारो भव॥

जो अक्रोधी, व्रती, शीलवान, बहुश्रुत, संयमी आणि अन्तिम-शरीर धारी (म्हणजे ज्याला आता पुनः जन्म नाही) आहे त्याला मी ब्राम्हण म्हणतों.

उप्पलवर्णा (थेरी)

राजगृह (वेणुवन)

४०१ वारि पोक्खरपत्ते'व आरग्गेरिव सासपो ।
यो न लिप्पति कामेसु तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥१९॥

कमळाचे पानावर पाणी आणि आरीचे टोकावर ज्याप्रमाणे राई चिकटत नाही त्याप्रमाणे जो कामभोगांत रममाण नसतो त्याला मी ब्राम्हण म्हणतों.

कोणी ब्राम्हण

जेतवन

४०२ यो दुक्खस्स पजानाति इधेव खयमत्तनो ।
पन्नभार विसञ्ञुत्तं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥२०॥

ज्याने ह्याच जन्मांत आपल्या दुःख-क्षयाचा साक्षात्कार केला आहे, ज्याने आपलें ओझें फेकून दिलें आहे व जो आसक्तिरहित बनला आहे त्याला मी ब्राम्हण म्हणतों.

खेमा (भिक्षुणी)

राजगृह (गृध्रकूट)

४०३ गंभीरपञ्ञं मेधाविं मग्गामग्गस्स कोविदं ।
उत्तमत्थं अनुप्पत्तं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥२१॥

ज्याची प्रज्ञा गंभीर अथवा खोल आहे, जो बुद्धिमान आहे, मार्ग आणि अमार्ग ज्याला कळतो, ज्याला सर्वोत्तम पद प्राप्त झालें आहे अशाला मी ब्राम्हण म्हणतों.

(पब्भारवासी) तिस्स (थेर)

जेतवन

४०४ असंसट्ठं गहट्ठेहि अनागारेहि चूभयं ।
अनोकसारिं अप्पिच्छं तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥२२॥

जो गृही अथवा अगृही ह्या दोहों पासून भिन्न आहे, जो अनाश्रित व अल्पेच्छ आहे त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

जेतवन कोणी भिक्षु

४०५ निधाय दण्डं भूतेषु तसेसु थावरेसु च ।
यो न हन्ति न घातेति तमहं ब्रूमि ब्राम्हणं ॥२३॥

प्रहारविरत होवून जो चराचर प्राणिमात्रांना मारीत नाही किंवा मारण्याची प्रेरणा करीत नाही अशाला मी ब्राह्मण म्हणतों.

जेतवन चार श्रामणेर

४०६ अविरुद्धं विरुद्धेसु अत्तदण्डेसु निब्बुतं ।
सादानेसु अनादानं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥२४॥

विरोधकांमध्ये जो अविरोधी आहे, दण्डधाऱ्यांमध्ये जो निश्चल आहे, आसक्तांत जो अनासक्त आहे त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

राजगृह (वेणुवन) महापन्थक (थेर)

४०७ यस्स रागो च दोसो च मानो मक्खो च पातितो ।
सासपोरिव आरग्गा तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥२५॥

आरीवरून जशी राई, खाली पडते त्याप्रमाणे ज्याच्यापासून राग, द्वेष, मान आणि दंभ गळून पडले आहेत अशाला मी ब्राह्मण म्हणतों.

४०८ अकक्कसं विञ्ञापनिं गिरं सच्चं उदीरये ।
याय नाभिसजे किञ्चि तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥२६॥

ज्याचें वचन मृदु, सार्थक व सत्य असतें, ज्यामुळें इतरांना राग होत नाही, अशाला मी ब्राह्मण म्हणतों.

जेतवन कोणी स्थविर

४०९ यो'ध दीघं व रस्सं वा अणुं थूलं सुभासुभं ।
लोके अदिन्नं नादियति तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥२७॥

दीर्घ असो किंवा ऱ्हस्व असो, मोठी असो किंवा लहान असो, शुभ असो किंवा अशुभ असो, जो या जगांत न दिलेलें असें कांहीच ग्रहण करीत नाही, अशाला मी ब्राह्मण म्हणतों.

जेतवन सारिपुत्र (थेर)

४१० आसा यस्स न विज्जन्ति अस्मिं लोके परम्हि च ।
निरासयं विसंयुत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥२८॥

इहलोक आणि परलोकाविषयी ज्याच्या सर्व आकांक्षा नष्ट झाल्या आहेत, जो आशारहित आणि आसक्तिरहित आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

जेतवन महामोग्गल्लान (थेर)

४११ यस्सालया न विज्जन्ति अञ्ञाय अकथंकथी ।
अमतोगधं अनुप्पत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥२९॥

ज्याची तृष्णा नष्ट झाली आहे, जो संशयरहित झालेला आहे, व ज्याने अमृतपद म्हणजे निर्वाण प्राप्त केलें आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

श्रावस्ती (पूर्वाराम) रेवत (थेर)

४१२ योधपुञ्ञञ्च पापं च उभो संगं उपच्चगा ।
असोकं विरजं सुद्धं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३०॥

ज्याची पाप-पुण्य या दोन्हीवरील आसक्ति नष्ट झाली आहे, जो शोकरहित, निर्मल आणि शुद्ध आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

चन्दाभ (थेर)

जेतवन

४१३ चन्दं'व विमलं सुद्धं विप्पसन्नमनाविलं।
नन्दीभवपरिक्खीणं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३१॥

जो चन्द्राप्रमाणे निर्मळ, शुद्ध आणि स्वच्छ आहे, त्याचप्रमाणे ज्याची भवतृष्णा नष्ट झाली आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

सीवलि (थेर)

कुण्डिया (कोयली)

४१४ यो इमं पलिपथं दुग्गं संसारं मोहमच्चगा।
तिण्णो पारगतो झायी अनेजो अकथंकथी।
अनुपादाय निब्बुतो तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३२॥

ज्याने ह्या दुर्गम संसारचक्रांत टाकणाऱ्या मोहरूपी उलट्या मार्गाला सोडून दिलें आहे; जो संसार-तीर्ण, पारंगत, ध्यानी, निःशंक व निश्चल आहे व तृष्णेपासून निवृत्त झाल्यामुळे परम सुखी आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

सुन्दरसमुद्द (थेर)

जेतवन

४१५ यो'ध कामे पहत्वान अनागारो परिब्बजे।
कामभवपरिक्खीणं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३३॥

जो येथे कामवासनांचा त्याग करून अगृही व परिव्राजक होतो, ज्याचे काम-भव नष्ट झाले आहेत, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

जटिल (थेर)

राजगृह (वेणुवन)

४१६ यो'ध तण्हं पहत्वान अनागारो परिब्बजे।
तण्हाभवपरिक्खीणं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३४॥

जो येथे तृष्णेचा त्याग करून अगृही परिव्राजक होतो; ज्याची भव-तृष्णा नष्ट झाली आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

[illegible] पुरा ठपाइ—
विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

राजगृह (वेणुवन) भूतपूर्व नटभिक्षु

४१७ हित्वा मानुसकं योगं दिब्बं योगं उपच्चगा ।
सब्ब योगविसंयुत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३५॥

ज्याने मनुष्य-बन्धनें सोडून दिव्य बन्धनाना मुद्दा सोडलें आहे व जो सर्व बन्धनापासून मुक्त आहे त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

४१८ हित्वा रतिं च अरतिं च सीतिभूतं निरुपधिं ।
सब्बलोकाभिभुं वीरं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३६॥

रति आणि अरति ह्यांचा त्याग करून जो शान्त आणि निरुपाधी झाला आहे, जो सर्वलोक-जित् वीर आहे त्याला मी ब्राम्हण म्हणतों.

राजगृह (वेणुवन) वङ्गीस (थेर)

४१९ चुतिं यो वेदि सत्तानं उपपत्तिं च सब्बसो ।
असत्तं सुगतं बुद्धं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३७॥

जो प्राण्यांची उत्पत्ति आणि लय यांसंबंधी तऱ्हेनें जाणतो, जो निःसंग आहे, जो सद्गतीला पोहोचलेला आहे, जो बुद्ध म्हणजे संपूर्ण ज्ञानी आहे, अशाला मी ब्राह्मण म्हणतों.

४२० यस्स गतिं न जानन्ति देवा गन्धब्बमानुसा ।
खीणासवं अरहन्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३८॥

ज्याची गति देव, गन्धर्व किंवा मनुष्य जाणूं शकत नाही, जो मलरहित आहे, जो अर्हत् आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

राजगृह (वेणुवन) धम्मदिन्ना (थेर)

४२१ यस्स पुरे च पच्छा च मज्झे च नत्थि किंचनं ।
अकिंचनं अनादानं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३९॥

जेतवन — चन्दाभ (थेर)

४१३ चन्दं'व विमलं सुद्धं विप्पसन्नमनाविलं ।
नन्दीभवपरिक्खीणं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३१॥

जो चन्द्राप्रमाणे निर्मळ, शुद्ध आणि स्वच्छ आहे, त्याचप्रमाणे ज्याची भवतृष्णा नष्ट झाली आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो.

कुण्डिया ( कोयली ) — सीवलि ( थेर )

४१४ यो इमं पलिपथं दुग्गं संसारं मोहमच्चगा ।
तिण्णो पारगतो झायी अनेजो अकथंकथी ।
अनुपादाय निब्बुतो तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३२॥

ज्याने ह्या दुर्गम संसारचक्रांत टाकणाऱ्या मोहरूपी उलट्या मार्गाला सोडून दिले आहे; जो संसार–तीर्ण, पारंगत, ध्यानी, निःशंक व निश्चल आहे व तृष्णेपासून निवृत्त झाल्यामुळे परम सुखी आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो.

जेतवन — सुन्दरसमुद्द ( थेर )

४१५ यो'ध कामे पहत्वान अनागारो परिब्बजे ।
कामभवपरिक्खीणं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३३॥

जो येथे कामवासनांचा त्याग करून अगृही व परिव्राजक होतो, ज्याचे काम-भव नष्ट झाले आहेत, त्याला मी ब्राह्मण म्हणतो.

राजगृह (वेणुवन) — जटिल ( थेर )

४१६ यो'ध तण्हं पहत्वान अनागारो परिब्बजे ।
तण्हाभवपरिक्खीणं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३४॥

जो येथे तृष्णेचा त्याग करून अगृही परिव्राजक होतो; ज्याची भव-तृष्णा नष्ट झाली आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो.

## परिशिष्ट १

# पंढरीचा विठ्ठल

संतश्रेष्ठ तुकाराम महाराज आपल्या अमर वाणींत म्हणतात—

तरिच जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥
नाही तरि काय थोडीं । श्वान शूकरें बापुडीं ॥

आपल्या जन्माचें जर मनुष्याला सार्थक करावयाचें असेल तर त्याने विठ्ठलाला शरण गेलेंच पाहिजे. नाहीतर त्याच्यांत व जनावरात कांहीच फरक नाही, असा या अभंगाचा स्पष्ट अर्थ होतो. ज्या विठ्ठलाला शरण जाण्याकरिता तुकाराम महाराज सगळ्या वारंवार उपदेश करितात तो विठ्ठल आहे तरी कोण, हा प्रश्न सहजच उद्भवतो. पंढरपुरचा विठ्ठल दुसरा कोणी नसून भगवान् बुद्धच आहे अशी परंपरा महाराष्ट्रांत प्रचलित आहे व ती यथार्थच आहे. या परंपरेच्या पुष्टीकरिता मी खालील कारणें वाचकांपुढे विचारार्थ मांडितो व आशा बाळगतो की सुज्ञ वाचक वर्ग त्याचा निरपेक्ष बुद्धीने विचार करील.

(१) आपल्या महाराष्ट्रांत जे अनेक संत होऊन गेले त्या सर्वांचें विठ्ठल हें आद्य दैवत आहे हें अगदी स्पष्ट आहे. ज्ञानेश्वरापासून तो तुकाराम महाराजांपर्यंत सर्व संत पंढरीच्या विठ्ठलाचे निस्सीम उपासक आहेत. हे सर्व संत विष्णुभक्त असून विठ्ठलाला ते विष्णूचें रूप मानतात. तुकाराम महाराज म्हणतात.:—

ज्याच्या मागे, पुढे किंवा मध्ये कांहीच नाही, जो अकिंचन व अनासक्त आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

जेतवन अंगुलिमाल (थेर)

४२२ उसभं पवरं वीरं महेसिं विजिताविनं ।
अनेजं नहातकं बुद्धं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥४०॥

जो श्रेष्ठ आहे, जो सर्वोत्तम आहे, जो वीर आहे, जो महर्षि आहे जो विजेता आहे, जो निष्कंप आहे, जो शुद्ध आहे, जो बुद्ध आहे त्याला मी ब्राह्मण म्हणतों.

जेतवन देवहित ब्राम्हण

४२३ पुब्बेनिवासं यो वेदि सग्गापायं च पस्सति
अथो जातिक्खयं पत्तो अभिञ्ञावोसितो मुनि ।
सब्बवोसित वोसानं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥४१॥

जो आपले पूर्व जन्म जाणतो, ज्याने सुगति आणि दुर्गति पाहिली आहे, ज्याचा पूर्व-जन्म नष्ट झाला आहे, ज्याची प्रज्ञा पूर्ण झाली आहे व जें कांही करावयाचें आहे तें सर्व ज्याने केलें आहे त्याला मी ब्राह्मण म्हणतो.

---

विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

परिशिष्ट १

# पंढरीचा विठ्ठल

संतश्रेष्ठ तुकाराम महाराज आपल्या अमर वाणींत म्हणतात—

तरिच जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥
नाही तरि काय थोडीं । श्वान शूकरें बापुडीं ॥

आपल्या जन्माचें जर मनुष्याला सार्थक करावयाचें असेल तर त्याला विठ्ठलाला शरण गेलेंच पाहिजे. नाहीतर त्याच्यांत व जनावरांत कांहींच फरक नाही, असा या अभंगाचा स्पष्ट अर्थ होतो. ज्या विठ्ठलाला शरण जाण्याकरिता तुकाराम महाराज जगाला वारंवार उपदेश करितात तो विठ्ठल आहे तरी कोण, हा प्रश्न सहजच उद्भवतो. पंढरपुरचा विठ्ठल दुसरा कोणी नसून भगवान् बुद्धच आहे अशी परंपरा महाराष्ट्रांत प्रचलित आहे व ती यथार्थच आहे. ह्या परंपरेच्या पुष्टीकरिता मी खालील कारणें वाचकांपुढे विचारार्थ मांडितों व आशा बाळगतों की सुज्ञ वाचक वर्ग त्यांचा निरपेक्ष बुद्धीने विचार करील.

(१) आपल्या महाराष्ट्रांत जे अनेक संत होऊन गेले त्या सर्वांचें विठ्ठल हें आद्य दैवत आहे हें अगदी स्पष्ट आहे. ज्ञानेश्वरापासून तों तुकाराम महाराजांपर्यंत सर्व संत पंढरीच्या विठ्ठलाचे निस्सीम उपासक आहेत. हे सर्व संत विष्णुभक्त असून विठ्ठलाला ते विष्णूचें रूप मानतात. तुकाराम महाराज म्हणतात.:—

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म ।
भेदाभेद भ्रम अमंगळ ॥

ज्याची पूजा भारतांत कमी अधिक प्रमाणात प्रचलित आहे असे राम, कृष्ण व बुद्ध हे तीनच विष्णूचे लोकप्रिय अवतार आहेत असें आपण साधारणपणें म्हणूं शकतों. भगवान बुद्धाला आपण विष्णूचा अवतार मानतो हें अगदी निर्विवाद सत्य आहे. ह्याकरितां जर पुराव्याची आवश्यकता असली तर मी खालील पुरावा देत आहें.

(१) वासुदेवः पुनर्बुद्धः सम्मोहाय सुरद्विषाम् ।
वेदादीनां रक्षणाय अधर्महरणाय च ॥

गरुड पुराण

(२) नमो वेदरहस्याय नमस्ते वेदयोनये ।
नमो बुद्धाय शुद्धाय नमस्ते ज्ञानरूपिणे ॥

कूर्म पुराण

(३) बुद्धोवतस्य बुद्धोऽभूत् स्वयं पुत्रो जनार्दनः ।
त्यक्त्वा राज्य स्त्रीयं सोऽथ गतिं परमकां गतः ॥

वरील श्लोकांवरून गौतम बुद्धाला आपण दशावतारामध्ये स्थान दिलें आहे हें सिद्ध होतें. रामचंद्र प्रभूंचा ७ वा, श्रीकृष्णाचा ८ वा व गौतम बुद्धाचा ९ वा अवतार अशी ही अवतारपरंपरा आहे. आज आम्ही बुद्धाचे युगांत राहतों ही गोष्ट कोणीहि हिंदु नाकबूल करूं शकत नाही; कारण प्रत्येक हिंदु पूजेच्या वेळी आपल्या संकल्पात 'बुद्धावतारे' मंत्र म्हणून ह्या सत्याची यथार्थता पटवून देतो. आता रामाचा इतिहास आपणास रामायणांत आढळतो, श्रीकृष्णाचा भागवत पुराणांत किंवा महाभारतात; पण विठ्ठलाचा इतिहास आपणांस कोठेच दिसत नाही. आणि हें जर खरें आहे तर विठ्ठल कोण आहे हें जाणणें प्रत्येक सत्यप्रेमी मनुष्याचें कर्तव्य ठरतें. विठ्ठल हा जर राम किंवा कृष्ण नव्हे तर तो बुद्ध असणेंच स्वाभाविक नाही काय ?

... एक भारम कुश उखाडे—
विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज ।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव ॥

(२) आता विठ्ठल शब्दाच्या उत्पत्तीकडे आपण वळूं व तिज-पासून विठ्ठल कोण आहे हा प्रश्न सोडविण्यास आपल्याला कांही मदत होते की काय हें पाहूं. ह्यावर कांही लोक म्हणतील हा सर्व उपद्व्याप कशाला ? आम्ही विठ्ठलाला मानतों हें पुरें आहे. ह्याला माझें एवढेंच उत्तर आहे की डोळस अथवा अर्थयुक्त भावाने केलेली पूजा केंव्हाहि फलदायकच ठरते व अंधश्रद्धा ही केंव्हाहि घातुकच ठरते. आणि म्हणून आमची श्रद्धा सार्थच असली पाहिजे. विठ्ठल हा शब्द दोन शब्दांचा बनलेला आहे. विट्+ठल=विठ्ठल. विट आहे ठल अथवा स्थल ज्याचे तो विठ्ठल. आता विट हा शब्द जरी मराठी असला तरि ठल हा शब्द पाली असल्यामुळे आपण असें अनुमान काढूं शकतों की ज्या वेळीं भारतांत पाली भाषा प्रचलित होती त्या वेळीं हें विठ्ठलाचें मंदिर बांधण्यात आलें असलें पाहिजे. हा काळ म्हणजे सम्राट अशोकाचा काळ होय. प्रियदर्शी अशोकाने भगवान बुद्धाचीं ८४००० देवळें बांधलीं अशी परंपरा आहे व त्यांपैकीच हें एक मंदिर असावें असें मानणें अनुचित होणार नाही. पाली भाषा ही बौद्धांची धर्मभाषा आहे ही गोष्ट ह्या ठिकाणीं आम्हाला लक्षात ठेवली पाहिजे. सुप्रसिद्ध पाश्चात्य पंडित जॉन विल्सन आपल्या 'मेमॉयर ऑन दी केव्ह टेंपल' मध्ये हें मंदिर बौद्ध असल्याची साक्ष देतो.

(३) मंदिराचे सभामंडपांत दगडी खांबावर ध्यानस्थ बुद्धाच्या कोरीव मूर्ति आढळतात.

(४) आता आपण विठ्ठलाचे मूर्तीकडे वळूं व विठ्ठल हा एकटाच कां याचा विचार करूं. ज्या ज्या ठिकाणीं रामाचें मंदिर आहे त्या त्या ठिकाणीं रामाच्या शेजारीं सीतेची मूर्ति असते. तसेंच श्रीकृष्णाचे मंदिरांत श्रीकृष्णाचे शेजारीं रुक्मिणीची अथवा राधेची मूर्ति असते, पण विठ्ठल हा एकटाच कां ? विठ्ठलाचे शेजारीं बी रुक्मिणीची (?)

मूर्ति चित्रांत दाखविण्यांत येते ती रापयोल खोटी दाखविण्यांत येते. कारण विठ्ठलाचे शेजारीं कोणीच स्त्री नसून तो एकटाच विटेवर उभा आहे. वास्तविक रुक्मिणीची (?) मूर्ति विठ्ठलाचे शेजारीं नसून दुसऱ्या खोलींत आहे. राम अथवा कृष्ण हे संन्यासी नव्हते. उलट बुद्ध हे संन्यासी होते. व संन्याश्याचे शेजारीं त्याची स्त्री असणें असंभवनीय आहे आणि म्हणूनच विठ्ठल हा एकटाच विटेवर उभा आहे. विठ्ठलाचे शेजारीं चळेंच रुक्मिणी दाखविण्यांत चित्रकारांना असें भासवावयाचें आहे की विठ्ठल हा श्रीकृष्णच आहे. कारण रुक्मिणी ही श्रीकृष्णाची बायको आहे. विठ्ठल हा श्रीकृष्ण आहे किंवा नाही ह्या प्रश्नाचा विचार आपण ह्या लेखांत पुढे करूंच. पण मला तूर्त एवढेंच सांगाव-याचें आहे की विठ्ठल हा एकटाच असल्यामुळे तो बुद्ध असणेंच जास्त संभवनीय दिसतें.

(५) आता विठ्ठलाचे हात कंबरेवर कां ह्या प्रश्नाचा आपण येथे विचार करूं. राम हा धनुर्धारी आहे व श्रीकृष्णाचे हातांत गदा अथवा सुदर्शनचक्र असतें. पण विठ्ठलाचे हातांत कांहीच शस्त्र नाही ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे. श्रीरामचंद्र प्रभूने जगांतील अन्याय बाहु-बलाने नष्ट केले. श्रीकृष्णाने तेच अन्याय गदा अथवा सुदर्शनचक्र हातांत घेऊन नष्ट केले. पण विठ्ठलाने ह्या बाह्य साधनांचा मुळीच उपयोग केला नाही. त्याने जगांतील अन्याय आत्मबलाने नष्ट केले, असा कंबरे-वर हात असण्याचा स्पष्ट अर्थ होतो. ह्यासंबंधी बुद्धाचे जीवनांतील एक प्रसंग येथे देणें अपरिहार्य आहे. बुद्धाचे वेळीं अंगुलीमाल नावाचा एक क्रूर डाकू एका अरण्यांत राहत असे. लोकांना लुटणें हाच त्याचा धंदा होता. ज्यांना तो लुटत असे त्यांची करांगुली तो कापी व अशा करांगुलींची माळ त्याने आपल्या गळ्यांत घातली होती आणि म्हणून लोक त्याला 'अंगुलीमाळ' म्हणत. एकदा बुद्धाला या डाकूचे आश्रमापुढून जाण्याचा प्रसंग आला तेव्हा बुद्धाचे शिष्य त्याला त्या वाटेने न जाण्याविषयी विनवूं लागले. बुद्ध हासले व त्यांनी त्या वाटेने जाण्याचा

यिर्दाञ्छना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

आपला वेत कायम केला. बुद्ध जेव्हा अंगुलीमालाचे घरावरून जाऊं लागले तेव्हा अंगुलीमाळ आपल्या मनांत म्हणतो—"आश्चर्य आहे की हा संन्यासी माझे घरावरून एकटाच जाण्याचें धार्ष्ट्य कसें दाखवितो? वास्तविक ह्या प्रदेशांत माझा दरारा एवढा आहे की माझे घरापुढून वीस वीस, पंचवीस पंचवीस लोकसुद्धा एकजुटीने जाण्यास धजत नाहीत व गेलेच तर ते माझ्या तावडींतून सुटत नाहीत. पण हा संन्यासी एकटाच कसा जातो? ह्याला मौज दाखविलीच पाहिजे." असें म्हणून अंगुलीमालाने आपली तलवार उपसली व ती घेऊन तो बुद्धावर धावला. कांही वेळ धावल्यावर जेव्हा अंगुलीमाल बुद्धाला धरूं शकला नाही, तेव्हा तो उभा राहिला व बुद्धाला म्हणाला—'अरे ए संन्याशा, पळतो काय, थांब.' यावर, बुद्ध म्हणाले—'अरे मी पळत नाही, तूंच पळतोस.' ह्या उत्तराने अंगुलीमाल घोटाळ्यांत पडला व बुद्धाला तो म्हणाला—'संन्याशांची अशी ख्याति असते की ते खोटें बोलत नाहीत. पण तूं तर धादान खोटें बोलतोस. मी उभा असतांना तूं मला पळतो आहेस म्हणून म्हणतोस व तूं स्वतः पळत असतांना मी उभा आहें असें म्हणतोस. हें कोडें तूं सोडवशील काय?' यावर बुद्ध म्हणाले—'मी खोटें बोलत नसून अबाधित सत्यच तुला सांगत आहे. ज्या मनुष्याचें मन स्थिर झालें आहे असा मनुष्य जरी शरीराने चालत असला तरी तो स्थिरच आहे असें समज. उलट ज्या मनुष्याचें मन चंचल आहे (असें तुझें) असा मनुष्य जरी शरीराने उभा असला तरी तो भ्रमणच करतो.' बुद्धाचा हा अमृतमय उपदेश ऐकून अंगुलीमालाचे मनांत एकदम प्रकाश पडला. त्याला त्याच्या पापाची जाणीव झाली. आता त्याने आपली तलवार फेकून दिली व तो बुद्धाला शरण गेला. तो आता संन्यासी बनला व भगवान् बुद्धा बरोबर हिंडूं लागला. ह्या घटनेनंतर भगवान् बुद्ध आपल्या पुढच्या मुक्कामावर गेले. तेथे त्या देशाचा राजा मोठें सैन्य घेऊन आला होता. ह्या राजाचें तें सैन्य पाहून बुद्ध त्याला म्हणाले:—'हे राजन्, एवढें सैन्य

मूर्ति चित्रांत दाखविण्यांत येते ती सपशेल खोटी दाखविण्यांत येते. कारण विठ्ठलाचे शेजारी कोणीच स्त्री नसून तो एकटाच विटेवर उभा आहे. वास्तविक रुक्मिणीची (!) मूर्ति विठ्ठलाचे शेजारी नसून दुसऱ्या खोलीत आहे. राम अथवा कृष्ण हे संन्यासी नव्हते. उलट बुद्ध हे संन्यासी होते. व संन्याशाचे शेजारी त्याची स्त्री असणें असंभवनीय आहे आणि म्हणूनच विठ्ठल हा एकटाच विटेवर उभा आहे. विठ्ठलाचे शेजारी मुद्दाम रुक्मिणी दाखविण्यांत चित्रकारांना असें भासवावयाचें आहे की विठ्ठल हा श्रीकृष्णच आहे. कारण रुक्मिणी ही श्रीकृष्णाची बायको आहे. विठ्ठल हा श्रीकृष्ण आहे किंवा नाही या प्रश्नाचा विचार आपण ह्या लेखांत पुढे करूंच. पण मला तूर्त एवढेंच सांगावयाचें आहे की. विठ्ठल हा एकटाच असल्यामुळे तो बुद्ध असणेंच जास्त संभवनीय दिसतें.

(५) आता विठ्ठलाचे हात कंबरेवर कां या प्रश्नाचा आपण येथे विचार करूं. राम हा धनुर्धारी आहे व श्रीकृष्णाचे हातांत गदा अथवा सुदर्शनचक्र असतें. पण विठ्ठलाचे हातात कांहीच शस्त्र नाही ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. श्रीरामचंद्र प्रभूने जगांतील अन्याय बाहु-बलाने नष्ट केले. श्रीकृष्णाने तेच अन्याय गदा अथवा सुदर्शनचक्र हातांत घेऊन नष्ट केले. पण विठ्ठलाने ह्या बाह्य साधनांचा मुळीच उपयोग केला नाही. त्याने जगांतील अन्याय आत्मबलाने नष्ट केले, असा कंबरे-वर हात असण्याचा स्पष्ट अर्थ होतो. ह्यासंबंधी बुद्धाचे जीवनांतील एक प्रसंग येथे देणें अपरिहार्य आहे. बुद्धाचे वेळी अंगुलीमाल नांवाचा एक क्रूर डाकू एका अरण्यांत राहत असे. लोकांना लुटणे हाच त्याचा धंदा होता. ज्यांना तो लुटत असे त्यांची करांगुली तो कापी व अशा करांगुलींची माळ त्याने आपल्या गळ्यांत घातली होती आणि म्हणून लोक त्याला 'अंगुलीमाल' म्हणत. एकदा बुद्धाला या डाकूचे आश्रमापुढून जाण्याचा प्रसंग आला तेव्हा बुद्धाचे शिष्य त्याला त्या वाटेने न जाण्याविषयी विनवूं लागले. बुद्ध हासले व त्यांनी त्या वाटेने जाण्याचा

-

[illegible] पुरा तदाह:--
विरश्चिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज।
बुद्ध सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

आपला येत कायम केला. बुद्ध जेव्हा अंगुलीमालाचे घरावरून जाऊं लागले तेव्हा अंगुलीमाल आपल्या मनांत म्हणतो—"आश्चर्य आहे की हा संन्यासी माझे घरावरून एकटाच जाण्याचें धाडस कसें दाखवितो ? वास्तविक ह्या प्रदेशांत माझा दरारा एवढा आहे की माझे घरापुढून वीस वीस, पंचवीस पंचवीस लोकसुद्धा एकजुटीने जाण्यास धजत नाहीत व गेलेच तर ते माझ्या तावडींतून सुटत नाहीत. पण हा संन्यासी एकटाच कसा जातो ? ह्याला मौज दाखवितीच पाहिजे." असें म्हणून अंगुलीमालाने आपली तलवार उपसली व ती घेऊन तो बुद्धावर धावला. कांही वेळ धावल्यावर जेव्हा अंगुलीमाल बुद्धाला धरूं शकला नाही, तेव्हा तो उभा राहिला व बुद्धाला म्हणाला—'अरे ए संन्याश्या, पळतो काय, थांब.' यावर, बुद्ध म्हणाले—'अरे मी पळत नाही, तूंच पळतोस.' ह्या उत्तराने अंगुलीमाल घोटाळ्यांत पडला व बुद्धाला तो म्हणाला—'संन्याशांची अशी ख्याति असते की ते खोटें बोलत नाहीत. पण तूं तर धादात खोटें बोलतोस. मी उभा असताना तूं मला पळतो आहेस म्हणून म्हणतोस व तू स्वतः पळत असताना मी उभा आहें असें म्हणतोस. हें कोडें तूं सोडवशील काय ?' यावर बुद्ध म्हणाले—'मी खोटें बोलत नसून अबाधित सत्यच तुला सांगत आहे. ज्या मनुष्याचें मन स्थिर झालें आहे असा मनुष्य जरी शरीराने चालत असला तरी तो स्थिरच आहे असें समज. उलट ज्या मनुष्याचें मन चंचल आहे (असें तुझें) असा मनुष्य जरी शरीराने उभा असला तरी तो भ्रमणच करतो.' बुद्धाचा हा अमृतमय उपदेश ऐकून अंगुलीमालाचे मनांत एकदम प्रकाश पडला. त्याला त्याच्या पापाची जाणीव झाली. आता त्याने आपली तलवार फेकून दिली व तो बुद्धाला शरण गेला. तो आता संन्यासी बनला व भगवान् बुद्धा-बरोबर हिंडूं लागला. ह्या घटनेनंतर भगवान् बुद्ध आपल्या पुढच्या मुक्कामावर गेले. तेथे त्या देशाचा राजा मोठें सैन्य घेऊन आला होता. त्या राजाचें तें सैन्य पाहून बुद्ध त्याला म्हणाले:—'हे राजन् एवढें सैन्य

तें कशाला एकत्र केलेंस ! काय तुजवर दुसरा कोणी राजा आक्रमण करणार आहे ?' यावर तो राजा म्हणाला—'हे भगवन् मला बाहेरील शत्रूंचें भय नाही. पण माझ्या राज्यांत अंगुलीमाल नावाचा डाकू माझ्या प्रजेला त्रास देतो व त्याचें पारिपत्य करण्याकरिता मी हें सैन्य एकत्र केलें आहे.' ह्यावर बुद्ध म्हणाले 'जर मी अंगुलीमालला येथे आणलें तर ?' ह्यावर राजा म्हणाला:—'छे; तो ठरला अरण्यांत राहणारा डाकू. तो येथे कसा येणार ?' ह्यावर अंगुलीमालकडे बोट दाखवून बुद्ध म्हणाले—'हा पहा अंगुलीमाल.' अंगुलीमालला संन्याशाच्या वेषात पाहून राजाला आश्चर्य वाटलें व तो बुद्धाला म्हणाला—'हे भगवन् आपण धन्य आहां माझे जवळ जरी एवढें सैन्य आहे तरी मी आज-पर्यंत अंगुलीमालला धरूं शकलों नाही. पण आपणाजवळ तर सैन्य वगैरे कांहीच नाही, तरी पण आपण ह्याला येथे वश करून आणलें ही किती आश्चर्याची गोष्ट आहे ?' या गोष्टीवरून काय बोध निघतो ? बोध स्पष्टच आहे. व तो हा की आत्मबल हें केव्हांहि बाहुबलापेक्षा श्रेष्ठ आहे. आणि ह्याच कारणास्तव विठ्ठलाने बाहुबलाचा मुळीच उपयोग केला नाही व म्हणूनच त्याचे हात कंबरेवर ठेवलेले आढळ-तात. पुरीच्या जगन्नाथाविषयी सुद्धा असेंच म्हणतां येईल.- कारण जगन्नाथाला तर हातच नाहीत. आणि म्हणूनच पुरीचा जगन्नाथ सुद्धा बुद्धच आहे, अशीच परंपरा भारतात प्रचलित आहे. ह्या ठिकाणी भगवान् बुद्धाच्या शिकवणुकीचा एक महत्वाचा श्लोक देणें अप्रस्तुत होणार नाही. बुद्ध म्हणतात:—

> नहि वेरेन वेरानि सम्मन्तीध कुदाचनं ।
> अवेरेन च सम्मन्ति एस धम्मो सनन्तनो ॥

धम्मपद ५

म्हणजे द्वेषाने द्वेष कधीच शांत होत नाही. तर अद्वेषानेच तो शांत होतो. हाच सनातन धर्म आहे. ह्यापेक्षा उज्ज्वल संदेश कोणता असूं शकतो !

एक श्लोक पुन्हा उद्धृत—

विरचिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज ।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव ॥

(६) विठ्ठलाच्या मूर्तीचें जर आपण सूक्ष्म दृष्टीने अवलोकन केलें, तर तो बुद्ध असल्याच्या पुष्कळ खुणा तींत आपणांस आढळतील. उदाहरणार्थ, विठ्ठलाचे कान सुद्धा बुद्धाच्या कानाप्रमाणेच विशाल आहेत. विठ्ठलाचें वर्णन पीतांबरधारी असेंच आहे. बुद्ध हे संन्यासी होते ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. व बौद्ध संन्याशांचीं वस्त्रें पीत रंगाचीं असतात ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

(७) संतश्रेष्ठ तुकाराम महाराज विठ्ठलाला बुद्धच समजतात. ते म्हणतात—

बौद्ध अवतार माझिया अदृष्टा ।
मौन्य मुखें निष्ठा धरियेली ।।

त्याचप्रमाणे, गाथापंचक अर्थात् सकल संतगाथेंत (साखरेकृत) एकनाथ महाराज आपल्या अभंगांत (अभंग नंबर २५६०) म्हणतातः—

'मवधा बैसे स्थिर रूप । तया नाम बौद्ध रूप ।।
संत तया वारीं । तिष्ठताती निरंतरीं ।
पुंडलिकासाठी उभा । धन्य धन्य विठ्ठल शोभा।'

ह्यापेक्षा जास्त पुरावा कोणता हवा ?

(८) वारकरी संप्रदायाचें बाह्य निशाण भगवा झेंडा आहे. भगवा हा शब्द पाली आहे. भगवा हे भगवान बुद्धाचें एक नाव आहे. भगवा जरी भगवान अर्थसूचक शब्द असला तरी तो बुद्धालाच लावतात आणि म्हणून तें एक विशेष नाम आहे. म्हणून भगवा झेंडा ह्याचा सरळ अर्थ बुद्धाचा झेंडा असा होतो. बुद्धाचीं खालील नांवें आहेत—

बुद्धो दसबलो सत्था सब्बञ्ञु दिपदुत्तमो
मुनिंदो भगवा नाथो……इत्यादि

(९) जशी पुरीच्या जगन्नाथाविषयी तो बुद्ध असल्याची परंपरा प्रचलित आहे. तशीच विठ्ठल हा बुद्ध आहे, हीच परंपरा महाराष्ट्रांत प्रचलित आहे. बुद्धावताराचें चित्र दाखवितांना विठ्ठलाची मूर्तीच दाखविण्यांत येते. ह्या एकाच पुराव्यावरून विठ्ठल हा बुद्ध आहे ही गोष्ट सिद्ध होत नाही काय ?

(१०) विठ्ठलाविषयी बोलतांना तुकाराम महाराज म्हणतात—

'विठ्ठल गणपति दुजा नाही ।'

ह्या अभंगाचा स्पष्ट अर्थ हा आहे की विठ्ठल आणि गणपति हे एकच आहेत. आता गणपति व विनायक हे एकच अर्थसूचक शब्द आहेत हें कोणीहि नाकबूल करूं शकत नाही. बुद्धाचे एक नांव विनायकहि पण आहे ही गोष्ट लक्षांत ठेवली म्हणजे विठ्ठल व गणपति एकच कसे आहेत हें सहजच आपल्या लक्षांत येईल. अमरकोषांत बुद्धाचीं जीं अनेक नांवें आहेत त्यांत त्यांचें एक नांव विनायकहि पण आहे. अमरकोषांत बुद्धाचीं नांवें येणेंप्रमाणे आहेतः—

सर्वज्ञः सुगतो बुद्धो धर्मराजस्तथागतः ।
समन्तभद्रो, 'भगवान्', मारजित, लोकजित्, जिनः ।
षडभिज्ञो, दशबलोऽद्वयवादी विनायकः ।

ह्या सर्व विवेचनावरून विठ्ठलाप्रमाणे गणपति सुद्धा बुद्धच आहे ही गोष्ट सुद्धा सिद्ध होते. बुद्धाला गणपति म्हणण्याचें कारण हें की ज्या शाक्य लोकांत बुद्धाचा जन्म झाला ते शाक्य लोक, गण लोक म्हणजे प्रजातंत्रवादी लोक होते व त्यांचा नायक बुद्ध असल्यामुळे बुद्धाला गणपति अथवा विनायक म्हणतात.

(११) आतापर्यंत आपण विठ्ठलाचें बहिरंग पाहिलें. आता आपण त्याचें अंतरंग पाहूं. वास्तविक विठ्ठलाचें अंतरंग खडीसाखरेच्या खड्याप्रमाणे आत बाहेर सारखेंच गोड आहे. महाराष्ट्रांत विठ्ठ-

[illegible] एक कारण पुढे ठरावें—
चिरञ्जीवा सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गजः।
गुरु सर्वाणि पापानि [illegible] व्यक्तिकरो भव॥

भक्ताला वारकरी म्हणतात. वारकरी हा शब्द 'वारीकरी' ह्या शब्दाचा अपभ्रंश दिसतो. आणि म्हणून वारकरी शब्दाचा अर्थ पंढरीची वारी करणारा असाच होतो. तुळशीची माळ ही ह्या सांप्रदायाची खूण आहे. जेव्हा प्रथम कोणीहि मनुष्य ह्या सांप्रदायात प्रवेश करितो तेव्हा त्याला:—

(१) मी प्राण्यांची हिंसा करणार नाही,
(२) मी चोरी करणार नाही,
(३) मी व्यभिचार अथवा परस्त्रीगमन करणार नाही,
(४) मी खोटें बोलणार नाही,
(५) मी दारू पिणार नाही.

अशा अर्थाची किंबहुना हीच शपथ घ्यावी लागते. ही शपथच तर बुद्धाचे पंचशील अथवा सदाचरणाचे पांच नियम आहेत. व हीच शपथ बौद्ध धर्मांत प्रवेश करणाराला सर्वप्रथम ग्रहण करावी लागते. त्याचप्रमाणे वारकरी संप्रदायांतील लोक 'निदान पंढरपुरापुरतें तरी 'जातीचें बंधन म्हणजेच उच्चनीचभाव व स्पृश्यास्पृश्यभेद मानीत नाहीत, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. ह्या ठिकाणीं ब्राह्मण-अब्राह्मण, स्पृश्य-अस्पृश्य एकाच ठिकाणीं गोळा होतात व विठ्ठलाचे जयजयकारांत आपले सर्व भेद विसरतात. तुकाराम महाराज म्हणतात—

**यारे यारे लहान थोर । भलते जाती नारी नर ।।**

बुद्धाने आमच्या समाजात रूढ असलेली जातीयता नष्ट केली ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. तसेंच आमच्यांतील अस्पृश्यतेचा कलंक सुद्धा भगवान् बुद्धाने काढून टाकला व आम्हांला मानवधर्म शिकविला ही गोष्ट सुद्धा आम्हांला नाकबूल करतां येणार नाही. ह्याचें प्रत्यक्ष प्रमाण अस्पृश्य समाजाचे एकमेव नेते विद्वद्रत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा भगवान् बुद्धाविषयी व त्यांच्या धर्माविषयी नितांत आदर. ह्यावरून हें स्पष्ट होतें की भगवान् बुद्ध हे जातीयतेविरुद्ध व त्याचप्रमाणे अस्पृश्यतेविरुद्ध एकमेव औषध आहेत. भगवान् बुद्ध सिंहनाद करून म्हणतात:—

न जन्मा वसलो होति न जन्मा होति ब्राह्मणो ।
कम्मना वसलो होति कम्मना होति ब्राह्मणो ॥

म्हणजे मनुष्य जन्माने शूद्र होत नाही किंवा तो जन्माने ब्राह्मण होत नाही; तर कर्मानेच मनुष्य शूद्र होतो व कर्मानेच तो ब्राह्मण होतो.

(१२) आता विठ्ठल हा श्रीकृष्ण आहे काय, ह्या प्रश्नाचा आपण येथे विचार करूं. पंढरीमाहात्म्यांत विठ्ठलाचा इतिहास येणें-प्रमाणे दिला आहे. एकदा श्रीकृष्ण द्वारकेंत राधेशी खेळत होते. राधा श्रीकृष्णाच्या मांडीवर बसली होती. हें दृश्य पाहून रुक्मिणीला संताप आला व ती संतापून श्रीकृष्णापासून निघून गेली. हिंडतां हिंडतां रुक्मिणी पंढरपुराला आली व तेथेच ती वास करूं लागली. आता श्रीकृष्ण रुक्मिणीच्या शोधांत हिंडूं लागले व जेव्हा रुक्मिणी त्यांना पंढरपुरला दिसली तेव्हा तेहि तेथेच वास करूं लागले. हाच थोडक्यांत पंढरीचे विठ्ठलाचा इतिहास. आता श्रीकृष्ण जेव्हा प्रथम पंढरपुरला आले तेव्हा ते गोपालपुरला उतरले अशी एक परंपरा आहे. गोपालपुर हें स्थान पंढरपुरापासून एक मैलाचें अंतरावर आहे. येथे श्रीकृष्ण उतरल्याच्या खुणा असून श्रीकृष्णाचें मंदिर सुद्धा आहे. इतकेंच नव्हे तर विठ्ठलाचे मंदिराचे जवळच श्रीकृष्णाचें दुसरें एक भव्य मंदिर आहे. श्रीकृष्णच जर विठ्ठल असते तर मग श्रीकृष्णाचें स्वतंत्र मंदिर कशें असूं शकतें ? आपल्यासमोर जर श्रीकृष्ण व विठ्ठल अशा दोन स्वतंत्र विभूति दिसतात तर दोन्ही एकच आहेत असें म्हणणें हास्या-स्पद नाही काय ? ह्या गोष्टीची पंढरीमाहात्म्यकाराला पूर्ण जाणीव होती आणि म्हणूनच शेवटीं त्यालाहि 'न चोरेशि बौद्ध हा' हीच स्पष्ट कबूली द्यावी लागते. विठ्ठल हा श्रीकृष्ण नाही ह्या मताचे पुष्टीकरिता मी ज्ञानेश्वर महाराजांची खालील ओवी विचारार्थ मांडतों:—

'रूप पाहतां लोचनीं ।
सुख जालें हो साजणी ॥

एक भारम पुरा उघाडे—
पिपासिना सहोत्पन्न परमेष्ठिनिरार्जनः ।
सद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकतो भव ॥

तो हा विठ्ठल बरवा ।
तो हा माधव बरवा ।।
बहुता सुकृताची जोडी ।
म्हणुनि विठ्ठल आवडी ।।

या ओवींत ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की विठ्ठलाचें रूप पाहून मला आनंद होतो. मला विठ्ठलहि चांगला व माधव अथवा श्रीकृष्णहि चांगला, परंतु विठ्ठलांत पुष्कळ सुकृत साठवलें असल्यामुळे मला विठ्ठलच आवडतो. ह्यावरून विठ्ठल व श्रीकृष्ण हे भिन्न पुरुष आहेत हें सिद्ध होत नाही काय? तसेंच गोपाळपुरींतील श्रीकृष्णाच्या मंदिरांत व पंढरीच्या विठ्ठलमंदिरांत निरनिराळ्या तिथीला निरनिराळे काल्याचे उत्सव होतात. गोपाळपुरीला आषाढ शुद्ध १५ म्हणजे पौर्णिमेला गोपाळकाला होतो तर विठ्ठलाचा 'महाद्वार' काला आषाढ वद्य प्रतिपदेला होतो. ह्या ठिकाणीं आणखी एक गोष्ट नमूद केल्याशिवाय राहवत नाही. महानुभाव लोक कृष्णभक्त आहेत ही लक्षांत ठेवण्या-सारखी गोष्ट आहे. महानुभाव लोक जेव्हा पंढरपुरला यात्रेला जातात तेव्हा ते विठ्ठलाचें दर्शन घेत नाहीत. ते फक्त श्रीकृष्णाचेंच दर्शन घेतात. ह्यावरून विठ्ठल हा श्रीकृष्ण नाही, हें सिद्ध होत नाही काय?

(१३) विठ्ठल एका पायाने लंगडा आहे अशी एक आख्यायिका आहे. बुद्धावर त्यांचे प्रतिस्पर्धी देवदत्त याने एक मोठी शिळा पर्वतावरून टाकल्यामुळे त्याच्या पायाला जबर दुखापत झाली होती, ही गोष्ट सर्व सर्वश्रुतच आहे. आणि म्हणून वरील आख्यायिकेचा ह्या घटनेशीं स्पष्ट संबंध जुळल्यामुळे विठ्ठल हे बुद्धच आहेत ही गोष्ट सिद्ध होते.

ह्या सर्व विवेचनावरून विठ्ठल हा बुद्धच आहे हें निःसंदिग्धपणें सिद्ध होतें.

आता ही झाली बुद्धाची अप्रत्यक्षरूपाने पूजा. आज भारतांत भगवान् बुद्धाची पूजा प्रत्यक्षरीत्या होणे आवश्यक आहे. कारण बुद्धामुळे

भारताला दोन ठळक फायदे मिळतात. पहिला फायदा हा की, बुद्धाची शिकवण आमच्या समाजांत रूढ असलेली जातीयता व अस्पृश्यता नष्ट करण्यास समर्थ आहे, कारण जातीशिवाय हिंदूच नाही ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. जातीयता नष्ट झाल्यावर आमचा समाज संघटित, एकजिनसी व बलवान बनेल. आज आम्हांला हें लक्षांत ठेवलें पाहिजे की आम्ही जर आपल्यांतील भेदांचा नाश केला नाही तर ते भेदच आमचा नाश करतील. म्हणून मिळालेलें स्वातंत्र्य टिकविण्याकरिता भारतांत आज भगवान् बुद्धाचें पुनरुत्थान झालेंच पाहिजे व ह्याच कारणास्तव आपल्या राष्ट्राने स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बुद्धाचें धर्मचक्र, ज्याला आपण 'अशोकचक्र' म्हणतों, आपल्या राष्ट्रध्वजांत ग्रहण करून त्याला अग्रस्थान दिलें आहे. आमचा राष्ट्रध्वज आमचा अभिमान आहे. तो आमचें सौभाग्य चिन्ह आहे. बुद्ध आज आमच्या गणराज्याचे 'गणपति' आहेत हें एक निर्विवाद सत्य आहे. आणि म्हणूनच त्या परम कारुणिक बुद्धाने आम्हाला हें 'अशोक चक्र' दिलं आहे त्या पुरुषोत्तमाचें भारतांत पुनरुत्थान होणें अत्यावश्यक आहे. बुद्धापासून दुसरा फायदा हा की बुद्धामुळे भारताला जगांत पहिलें स्थान मिळेल. बुद्धाची जन्मभूमि या नात्याने सर्व बौद्ध जगत् म्हणजे चीन, जपान, सयाम, तिबेट, ब्रह्मदेश, लंका, कोरिया वगैरे देश भारताला जगांतील सर्वश्रेष्ठ पवित्रभूमि मानते. आणि म्हणूनच 'कृण्वंतो विश्वमार्यम्' ही वेदोक्ति जर कोणी यथार्थ करून दाखविली असेल तर ती नरश्रेष्ठ गौतम बुद्धानेच असें म्हणणें अयथार्थ होणार नाही. आणि म्हणूनच 'बुद्धं शरणं गच्छामि' चा जयघोष आज भारतांत सर्वत्र झालाच पाहिजे, कारण त्यांतच केवळ भारताचेच नव्हे तर समस्त विश्वाचें कल्याण आहे.

गणराज्यदिन, नागपूर, दिनांक २६।१।५४

एक वाक्य पुन्हा उद्धृत—

चिरंजीवा सद्धोत्पन्न पर्याप्तनिरर्गम।
बुद्ध सर्वाणि पापानि दृष्ट्वा स्वनिकारो भव॥

परिशिष्ट २

# त्रिशरण आणि पंचशील

त्रिशरण म्हणजे शरण जाण्याला तीन योग्य स्थानें. बुद्ध, धर्म व संघ हीं तीन शरणस्थानें आहेत. संघ म्हणजे भिक्षुसंघ अथवा साधुसंतांचा संघ.

१ नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा संबुद्धस्स ।
संपूर्ण ज्ञानी पूज्य भगवान् बुद्धाला माझा नमस्कार असो.
नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा संबुद्धस्स ।
संपूर्ण ज्ञानी पूज्य भगवान् बुद्धाला माझा नमस्कार असो.
नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा संबुद्धस्स ।
संपूर्ण ज्ञानी पूज्य भगवान् बुद्धाला माझा नमस्कार असो.
बुद्धं सरणं गच्छामि ।
मी बुद्धाला शरण जातों.
धम्मं सरणं गच्छामि ।
मी धर्माला शरण जातो.
संघं सरणं गच्छामि ।
मी संघाला शरण जातो.
दुतियंपि बुद्धं सरणं गच्छामि ।
दुसऱ्यांदा सुद्धा मी बुद्धाला शरण जातो.

**दुतियंपि धम्मं सरणं गच्छामि ।**

दुसऱ्यांदा सुद्धा मी धर्माला शरण जातों.

**दुतियंपि संघं सरणं गच्छामि ।**

दुसऱ्यांदा सुद्धा मी संघाला शरण जातों.

**ततियंपि बुद्धं सरणं गच्छामि ।**

तिसऱ्यांदा सुद्धा मी बुद्धाला शरण जातों.

**ततियंपि धम्मं सरणं गच्छामि ।**

तिसऱ्यांदा सुद्धा मी धर्माला शरण जातों.

**ततियंपि संघं सरणं गच्छामि ।**

तिसऱ्यांदा सुद्धा मी संघाला शरण जातों.

## पंचशील म्हणजे सदाचरणाचे पांच नियम

१ **पाणातिपाता वेरमणी सिक्खा पदं समादियामि ।**

प्राण्यांची हिंसा करणार नाही अशी मी शिक्षा ग्रहण करतों.

**अदिन्नादाना वेरमणी सिक्खा पदं समादियामि ।**

चोरी करणार नाही अशी मी शिक्षा ग्रहण करतों.

**कामेसु मिच्छा चारा वेरमणी सिक्खा पदं समादियामि ।**

व्यभिचार करणार नाही अशी मी शिक्षा ग्रहण करतों.

**मुसावादा वेरमणी सिक्खा पदं समादियामि ।**

खोटें बोलणार नाही अशी मी शिक्षा ग्रहण करतों.

**सुरा, मेरय मज्ज पमाद ट्ठाना वेरमणी सिक्खा पदं समादियामि ।**

दारू पिणार नाही अशी मी शिक्षा ग्रहण करतों.

---

[illegible] आरम गुरा ठराहे—

धिरशिना सहोत्पन्न पापेद्रिनिर्माण।

नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वामिको भव॥

परिशिष्ट ३

# २. महामङ्गल सूत्र

एवं मे सुतं । एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । अथ खो अञ्ञतरा देवता अभिक्कन्ताय रत्तिया अभिक्कन्तवण्णा केवलकप्पं जेतवनं ओभासेत्वा येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं अट्ठासि। एकमन्तं ठिता खो सा देवता भगवन्तं गाथाय अज्झभासि—

बहू देवा मनुस्सा च मंगलानि अचिन्तयुं ।
आकङ्खमाना सोत्थानं ब्रूहि मंगलमुत्तमं ॥१॥

असेवना च बालानं पण्डितानञ्च सेवना ।
पूजा च पूजनीयानं एतं मंगलमुत्तमं ॥२॥

पतिरूपदेसवासो च पुब्बे च कतपुञ्ञता ।
अत्तसम्मापणिधि च एतं मङ्गलमुत्तमं ॥३॥

बाहुसच्चञ्च सिप्पञ्च विनयो च सुसिक्खितो ।
सुभासिता च या वाचा एतं मङ्गलमुत्तमं ॥४॥

माता-पितु उपट्ठानं पुत्तदारस्स सङ्गहो ।
अनाकुला च कम्मन्ता एतं मङ्गलमुत्तम ॥५॥

दानञ्च धम्मचरिया च ञातकानञ्च सङ्गहो ।
अनवज्जानि कम्मा न एतं मङ्गलमुत्तमं ॥६॥

करणें, पूर्वजन्मसंचित पुण्य संपादन करणें व आपल्याला सन्मार्गावर लावणें हें उत्तम मंगल होय. ॥३॥ अंगीं बहुश्रुतपणा असणें, कला संपादन करणें, अंगीं शिष्टता बाळगणें व सुभाषण करणें हें उत्तम मंगल होय. ॥४॥ आई-वडिलांची सेवा करणें मूलबाळ व बायको यांचा सांभाळ करणें व उलाढाली न करणें हें उत्तम मंगल होय. ॥५॥ दान देणें, धर्माचरण करणें, आप्तेष्टांचा आदरसत्कार करणें, पापकर्मांपासून अलिप्त राहणें, हें उत्तम मंगल होय. ॥६॥ काया, वाचा व मनानें पाप न करणें, मद्यपान न करणें आणि धार्मिक कार्यांत तत्पर राहणें हें उत्तम मंगल होय. ॥७॥ गौरव करणें, नम्रता बाळगणें, सन्तुष्ट राहणें, केलेले उपकार स्मरणें आणि योग्य वेळीं धर्मश्रवण करणें हें उत्तम मंगल होय. ॥८॥ क्षमाशील असणें अंगीं लीनता असणें, सन्तांचें दर्शन घेणें आणि योग्य वेळीं धार्मिक चर्चा करणें हें उत्तम मंगल होय. ॥ ९ ॥ तप, ब्रह्मचर्याचें पालन, आर्य सत्यांचें दर्शन आणि निर्वाणाचा साक्षात्कार हें उत्तम मंगल होय. ॥१०॥ ज्याचें मन लोकधर्मानें विचलित होत नाहीं तो निःशोक, निर्मल आणि निर्भय राहतो, हें उत्तम मंगल होय. ॥११॥ येणेंप्रमाणें कार्य करून सर्वत्र अपराजित राहून लोककल्याणाला प्राप्त करितात, हें त्यांच्याकरितां [देव आणि मनुष्यांकरितां] उत्तम मंगल होय. ॥१२॥



## ३. करणीयमेत्त सूत्र

करणीयमत्थकुसलेन,
यन्तं सन्तं पद अभिसमेच्च ।
सक्को उजू च सूजू च,
सुवचो चस्स मुदु अनतिमानी ॥१॥

सन्तुस्सको च सुभरो च,
अप्पकिच्चो च सल्लहुकवुत्ति ।
सन्तिन्द्रियो च निपको च,
अप्पगब्भो कुलेसु अननुगिद्धो ॥२॥

न च खुद्दं समाचरे किञ्चि,
येन विञ्ञू परे उपवदेय्युं,
सुखिनो वा खेमिनो होन्तु
सब्बे सत्ता भवन्तु सुखितत्ता ॥३॥

ये केचि पाणभूतत्थि तसा वा,
थावरा वा अनवसेसा ।
दीघा वा ये महन्ता वा
मज्झिमा रस्सका अणुकथूला ॥४॥



[illegible] एक बार में कुश उखाड़े—
विरञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठिन्निसर्गज।
नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव॥

अर्थ—शान्तिपदाची प्राप्ति इच्छिणाऱ्या कल्याणसाधननिपुण मनुष्याला ही इच्छा पाहिजे की त्याने योग्य, सरळ, अत्यन्त सरळ बनावें, त्याची वाणी सुंदर असावी व तो मृदु आणि निरभिमानी असावा. ॥१॥ तो संतुष्ट असून प्रामाणिक उपायांनी जीवन चालविणारा असावा. तो उचापती करणारा नसावा आणि तो अल्पसंतुष्ट, शान्त-इन्द्रिय, प्रज्ञावान्, गंभीर व कुटुंबात अनासक्त असावा. ॥२॥ त्याचे हातून क्षुल्लकांत क्षुल्लक असें देखील कृत्य न घडो की ज्याकरितां सूज्ञ लोक त्याला दोष लावतील. -सर्व प्राणि सुखी, क्षेमवान् व आनंदी राहोत ही भावना त्याने सदैव बाळगावी. ॥३॥ जंगम अथवा स्थावर, दीर्घ अथवा महान्, मध्यम अथवा लहान, सूक्ष्म अथवा स्थूल, दृष्ट अथवा अदृष्ट, दूरस्थ अथवा जवळ उत्पन्न झालेले किंवा उत्पन्न होणारे जितके म्हणून प्राणी आहेत ते सर्व सुखत्वाने नांदोत. ॥४-५॥ कोणी दुसऱ्यास फसवूं नये, कोणी दुसऱ्याचा अपमान करूं नये, शत्रुत्वाच्या अथवा विरोधाच्या भावनेने कोणी अशी इच्छा न बाळगो की दुसरे दुःखी होवोत. ॥६॥ आपल्या प्राणांची पर्वा न करितां ज्याप्रमाणे आई आपल्या एकुलत्या एक मुलाचें रक्षण करिते त्याचप्रमाणे [ शान्ति-पदाची इच्छा करणाऱ्याने ] प्राणिमात्राबद्दल निस्सीम प्रेमभाव वाढवावा. ॥७॥ वर, खाली आणि मधील सर्व लोक आणि प्राणी यांबद्दल निर्वैर आणि शत्रुत्वरहित मैत्रीभावना बाळगावी. ॥८॥ उभे असतां, चालले असतां, बसले असतां, झोपले असतां—जोंपर्यंत जागा आहे तोंपर्यंत ही मैत्रीभावना कायम ठेवावी, हिलाच ब्रह्मविहार म्हणतात. ॥९॥ असा शीलवान् व सम्यक् दृष्टिसंपन्न मनुष्य कोणत्याहि मिथ्या दृष्टींत न पडतां कामतृष्णेचा नाश करून जन्म-मरणाच्या फेऱ्यातून मुक्त होतो. ॥१०॥

समाप्त